








नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १८ वे ]          मे १९६५          [ अंक ८



वार्षिक वर्गणी ९ रु. ]          [ किरकोळ अंक १ रु.






प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष अठरावे — अंक आठवा

# नवभारत

मे १९६५

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. वेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. वेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमराववाडी, मुंबई २
फोन नं. २३५५४






प्रा. अरविंद मंगरूळकर, श्री. विनायक मोरेश्वर केळकर

# ज्ञानदेवीतील एका शब्दकोड्याचा उलगडा

'सत्यकथे'च्या ऑगस्ट १९६४ आणि सप्टेंबर १९६४ या दोन अंकामध्ये प्रा. मधुकर वासुदेव धोंड यांनी 'ज्ञानेश्वरीतील एक शब्दकोडे' या नावाचा एक प्रदीर्घ लेख लिहिलेला आहे. ज्ञानदेवीच्या साक्षेपी अभ्यासकांनीं त्याचे नीट परिशीलन करावे, अशा योग्यतेचा हा लेख आहे. त्या लेखात प्रा. धोंडांनी अनेक विषयांची चर्चा केली आहे. त्या सर्व विषयांचा परामर्श न करिता 'तुरंबणे' म्हणजे काय याच एका विषयाचा आम्ही येथे अधिक ऊहापोह करीत आहो. प्रा. धोंडांनी दिले आहेत, त्यापेक्षा या संदर्भात अधिक पुरावे देणे आणि वेगळा साधार युक्तिवाद करणे हे शक्य आहे, असे आम्हाला वाटते.

प्रथमच हे सांगणे अवश्य वाटते की, प्रा. धोंडांनी केलेली 'तुरंब' याची अर्थपूर्ण चर्चा उद्बोधक आहे. या चर्चेत त्यांनी शब्दकोश, ज्ञानदेवी, अनुभवामृत, इत्यादिकांचा आधार दिलेला आहे. परंतु हे सर्वच आधार काळजीपूर्वक परीक्षिले पाहिजेत. शब्दकोश हे अर्थाच्या बाबतीत प्रायः 'संग्राहक' असतात, 'निर्णायक' नसतात, हे प्रथमतः लक्षात घेतले पाहिजे. व्युत्पत्ती, प्रयोग आणि प्रयोगचिकित्सेच्या आधाराने निष्पन्न होणारे व्याकरण हेच अशा बाबतीत निर्णायक समजले पाहिजे. या व्यतिरिक्त चालीरीती, तत्कालीन व्यवहार यांचाही योग्य तो विचार केला पाहिजे.

### प्रा. धोंड यानी केलेल्या विवेचनाचा सारांश

प्रा. धोंडांच्या चर्चेचा संक्षेपाने आशय असाः– ज्ञानेश्वरीत "'तुरंबणे' हा शब्द वारंवार येतो. तो आपण तपासून पाहिला पाहिजे. 'तुरंबणे' म्हणजे 'डोकीत फुले माळणे' असा अर्थ सर्वच कोशात दिलेला आहे. याच अर्थाने हा शब्द कोकणीत आजही योजिला जातो. 'महाराष्ट्र-शब्दकोशा'त 'तुरंबी' (= १. तुळस, आंबा, पाच, इ०ची मंयरी...... ३. कोमल अंकुर, शेंडा) असा एक शब्द आढळतो. तो पाहिला की, 'तुरंबणे' हा शब्द 'डोकीत फुले माळणे' या अर्थाने कसा रूढ झाला असावा, याची कल्पना येते. ज्ञानेश्वरांच्या–

**मज तुरंबा कावो ( कां वो ? ) यिये तिये**
**जेणें वेधें हरि सोयरा होये** –अभंग ७२

या अभंगात हा शब्द याच अर्थाने आलेला आहे, हे स्पष्ट आहे." ज्ञानेश्वरीतील–

**जिये महासिद्धिचीं मूलपीठें ।**
**सीणली कमला जेथ वावटे**
**तियें कुसुमें अति चोंखटें ।**
**तुरंबिलीं देखिलीं ११·२१५**

याहीं ओवीत (फुले) 'माळिली होती' असाच सर्व संपादकांनी अर्थ केला आहे, आणि तो योग्यही आहे. परंतु या एकाच ठिकाणी सर्व संपादकांनी हा अर्थ केला आहे. अन्यत्र 'वास घेणें', 'हुंगणें' आणि एका ठिकाणी तर चक्क 'कांडणें' असा विक्षिप्त अर्थ केला आहे.

**पै गा भक्तीचेनि नावें । फूल मज येक देयावें**
**तें लेखें तरि मियां तुरंबावें । परि मुखीं चि घालीं**
**– ९·३८०.**

येथे सर्वच संपादकांनी 'तुरंबावे' याचा अर्थ 'हुंगावे' असा केला आहे. "पण येथे 'माळावे' असा अर्थ घ्यायला अडचण कोणती ?" तेव्हा तोच अर्थ घ्यावा.

**जैसा फुलाचेनि सांधातें ।**
**तांथू तुरंबिजे श्रीमंतें**
**तैसे द्विजसंगें शूद्रातें ।**
**स्वीकारीति श्रुती १८. ८१९.**

याही स्थळी फक्त माडगावकरांनी 'धारण करतात' असा अर्थ दिला आहे. इतर संपादकांनी 'वास घेतात' असा अर्थ केला आहे. तेव्हा "येथेही 'माळतात' असा अर्थ करायला अडचण कोणती ?" "'माळणे' म्हणजे 'शिरावर धारण करणे.'" 'पुष्पाणामनुषङ्गेण सूत्रं शिरसि धार्यते' या संस्कृतातील सुभाषितात तोच अर्थ आहे. तेव्हा 'तुरंबणे'चा

अर्थ ' माळणे ' हाच आहे. ' तांथू तुरंबिजे ' म्हणजेच ' सूत्रं शिरसि धार्यते '. ज्ञानेश्वरांच्या काळी श्रीमंत पुरुषच बहुधा फुले माळीत असत, हे ' श्रीमंते ' या प्रस्तुत ओवीतल्या शब्दावरून स्पष्ट होते.

**नाना वसोवा घातला चारु।**
**माथां तुरंबिला बूरु**
**न करी प्रत्योपकारु।**
**जेया परी १७. २८०.**

या ओवीत प्रा. दांडेकर ' तुरंबणे ' म्हणजे ' हुंगणे ' असा अर्थ घेऊन ' कृतघ्न माणसाचे मस्तक हुंगले तर तो ज्याप्रमाणे त्या प्रेमाचा मोबदला करीत नाही ', असा अर्थ करितात. पण हा अर्थ सर्वस्वी असमाधानकारक वाटतो. आगाशांनी बूरु = कोंडा आणि तुरंबणे = कांडणे असा अर्थ केला आहे. तो तर चुकीचाच आहे.

येथे ( १७·२८० ) बूरु = बोरू आणि तुरंबिला = माळतात, असा अर्थ आहे. " श्रीमंत लोक फुले माळतात आणि ती फुले केसांना सुवास देतात, कारकून बोरू माळतात आणि ते बोरू केसांवर कोणताच प्रत्युपकार करीत नाहीत, असा हा दृष्टांत आहे. "

वर ( १७·२७७–२८० ) उद्‌धृत केलेल्या ओव्यात एक आकृतिबंध दिसतो. या आकृतिबंधाची दोन अंगे आहेत. पहिले अंग म्हणजे यातील दृष्टांत वाचतानाच तद्विरोधी दृष्टांत लागलीच आठवावेत. दुसरे अंग असे की, यात इंद्रियांच्या सर्व संवेदना आल्या आहेत. तेव्हा १७·२८० मध्ये तुरंबणे = माळणे.

**एवं ॐ तत्सदाकार । ब्रह्मनाम तें त्रिप्रकार**
**हे फूल तुरंबी सुंदर । उपनिषद्गातें १७. ३४०.**

येथे आगाशांच्या मतानुसार तुरंबी = वास घे. प्रा. दांडेकरांनी ' हे फूल तुरंबी सुंदर । उपनिषद तें ' असा पाठ घेऊन "ह्या सुंदर फुलाचा उपनिषदे वास घेतात " असा अर्थ केला आहे; आणि त्याचे " म्हणजे उपनिषदांनी याचा चांगला विचार केला आहे " असे स्पष्टीकरणही केले आहे. " ' तुरंबणे ' म्हणजे ' हुंगणे ' वरून ' चांगला विचार करणे ' इथपर्यंत प्रा. दांडेकर आलेले दिसतात. वास्तविक अशा कोल्हाट्या उड्या मारण्याचे काहीच कारण नाही. इथे ' तुरंबी ' हे ... नाम आहे. आणि त्याचा अर्थ 'मंजरी'. उपनिषदांच्या शिरोभागी ॐ तत्सत् हे ब्रह्मनाम असते. ते कसे दिसते ? तर तुळशीच्या डोक्यावर शोभणाऱ्या तुरंबीप्रमाणे ' तुरंबी ' हे क्रियापदाचे रूप घ्यावयाचे असल्यास त्याचा "तुरंबीप्रमाणें शोभणे असाही अर्थ घेता येईल ... ' ॐ, तत् , सत् ' या तीन शब्दांप्रमाणेच तुळशीच्या मंजरीलाही तीन तुरे असतात, हे लक्षात आल्यावर या प्रतिमेतील सौंदर्य विशेषच प्रतीत व्हावे."
' अमृतानुभवां 'तही

**अहो ऐक्याचें मुदल न ढळे।**
**आंणि साजिरेपणाचा लाभु मिळे**
**तरी स्वतरंगाचीं मुकुळें।**
**तुरंबु कां पाणी** १-५९

येथेही संपादकानी ' तुरंबणे 'चा ' वास घेणे ' असाच अर्थ घेतला आहे. आता, ' मुकुल 'चा अर्थ पुष्प कसा ? 'पाण्याने लाटारूपी पुष्पांचा वास घ्यायचा' म्हणजे काय करायचे ? त्याने साजिरेपण कसे लाभते ? येथे ' तुरंबणे'चा 'माळणे' असा अर्थ घेऊनच ओवीचा अर्थ सुरेख लागत नाही काय ?

आणखी पाच ठिकाणी ज्ञानदेवीत ' तुरंबणे ' हा शब्द आला आहे : ९·११, १०·१८६, १५·५५, १६·३९, १६·३६१. " या सर्वच ठिकाणी सर्वच संपादकानी ' तुरंबणे' चा ' हुंगणे ' असाच अर्थ केला आहे. या ठिकाणी ' हुगणे ' असा अर्थ केल्याने कोणतीही अडचण निर्माण होत नसली, तरी या सर्वच ठिकाणी 'माळणे' हा अर्थही तेवढ्याच चपखलपणे बसू शकतो. **म्हणून 'तुरंबणे' हा शब्द ज्ञानेश्वरीत जिथे जिथे आला आहे, तिथे तिथे त्याचा ' माळणे ' हा एकच अर्थ करणे युक्त. ' हुंगणे ', ' कांडणें ' असे अर्थ कुठेही करण्याचे कारण नाही.** ( जाड ठसा आमचा ) ज्ञानेश्वरांच्या अभंगात तर ' तुरंबणे ' हा शब्द ' मस्तक ' या शब्दाच्या जोडीनेच दोनदा आला आहे. ( पहा : अभंग २२६, ४०७. ) **सारांश 'तुरंबणे 'चा ज्ञानेश्वरीत तरी ' माळणे ' हाच एकमेव अर्थ. "**

## 'तुरंबणे' शब्द असलेल्या ज्ञानदेवीतील ओव्या

प्रा. म. वा. धोंड यांचे ' तुरंबणे ' या शब्दाविषयीचे सर्व म्हणणे शक्यतो त्यांच्या शब्दांनी सांगितले. त्यांच्या या प्रतिपादनाचा आणि अर्थांचा आता








पृथक्करणपूर्वक विचार करावयाचा आहे. तत्पूर्वी हा शब्द ज्ञानदेवीत कोठे कोठे आला आहे, याची प्रथम आमूलाग्र नोंद करून ठेविली पाहिजे :

( १ ) सांवां परिमळें काइ तुरुंबावें ।
सागरें कवणी ठांइं नाहावें
हें गगन चि अडे आघवें ।
ऐसा पवाडु कैंचा — ९.११

पैं गा भक्तीचेनि नावें ।
फूल मज येक देयावें
तें लेखें तरि मियां तुरुंबावें ।
परि मुखीं चिं घालीं — ९.३८०

ययावरि तुम्हीं बोलिलें ।
हें आम्हीं नादासि किं रूप देखिलें
आजि चंदनतरुचीं फूलें ।
तुरुंबिलीं आम्हीं — १०. १८६

एया फल ना चुंबितां ।
फुल ना तुरुंबितां
जें काहिं पांडुसुता ।
तें रुख चि हा — १५. ५५

( २ ) जियें महासिद्धिचीं मूलपीठें ।
सीणली कमला जेथ वावटे
तियें कुसुमें अति चोखटें ।
तुरंबिलीं देखिलीं — ११. २१५

नाना वसोवा घातला चारु ।
माथां तुरंबिला बूरु
न करी प्रत्योपकारु ।
जेया परी १७. २८०.

जैसा फुलाचेनि सांघातें ।
तांथू तुरंबिजे श्रीमंतें
तैसें द्विजसंगे शूद्रातें ।
स्वीकारीति श्रुती १८. ८१९.

( ३ ) तैसें मीं गीता वाखाणीं ।
ये खपुष्पाची किर तुरंबिणी
परि समर्थें तुवां सिरियाणीं ।
फेडिली ते १६.३९.

कायि बहू सांघों ऐसे ।
ते आसुर प्रकृतिपीसे
तुरंबित असौसें
गगनौलेयां १६.३६१.

एवं ॐ तत्सदाकार ।
ब्रह्मनाम तें त्रिप्रकार
हें फूल तुरंबी सुंदर ।
उपनिषदातें १७.३४०.

## तुरंबणेचा अर्थ कोणत्या ठिकाणी कसा लावावा

ज्ञानदेवीत हा शब्द अशाप्रकारे एकूण १० स्थळी आलेला आहे; आणि या १० स्थळांचे आम्ही वर दर्शविल्याप्रमाणे गटवारीने तीन विभाग केलेले आहेत. ते विभाग कोणत्या धोरणाने केलेले आहेत, याचा उलगडा पुढे होईलच. प्रथम प्रा. धोंडांच्या म्हणण्याचा क्रमशः विचार करू.

त्यांच्या मतानुसार प्रस्तुत शब्दाचे तीन अर्थ कोशामध्ये उपलब्ध आहेत :

( १ ) तुरंबणे=डोकीत फुले माळणे.
( २ ) तुरंबणे=हुंगणे, वास घेणे.
( ३ ) तुरंबणे=कांडणे.

शिवाय, ( ४ ) तुरंबी ( स्त्री )=मंजरी.

यातील ' कांडणे ' या अर्थाच्या बाबतीत आमचे प्रा. धोंडांशी मतैक्य आहे. आगाशानी सुचविलेला तो अर्थ १७.२८० येथे सर्वथा अनुपपन्न आहे. शिवाय, त्याला कोणत्याही सदृश स्थळाचा आधार नाही. व्युत्पत्तीचाही आधार नाही. म्हणून तो अर्थ आपण सर्व दृष्टीनी असिद्ध म्हणून सोडून देऊ. राहता राहिले दोन अर्थ : ( १ ) माळणे आणि ( २ ) हुंगणे. तुरंबी ( स्त्री. )= मंजरी या अर्थाचा प्रा. धोंडांनी ' माळणे ' हा अर्थ सिद्ध करण्यासाठी उपयोग करून घेतला आहे. आता, प्रा. धोंडांचा आग्रह असा आहे की, ' तुरंबणे ' याचा समग्र ज्ञानेश्वरीत ' माळणे ' असा एकमेव अर्थ आहे; दुसरा कोणताही नाही. ( पहा : सत्यकथा : सप्टेंबर १९६४ : पृ. २९. ) अर्थातच वर उद्धृत केलेल्या दहाही स्थळी ' माळणे ' असाच अर्थ केला पाहिजे. दुसरा कोणताही अर्थ चालणार नाही. परंतु त्याच ठिकाणी वर त्यांनी असेही म्हटले आहे की, " या ठिकाणी (म्हणजे– ९.११, १०.१८६, १५.५५, १६.३९, १६.३६१ ) ' हुंगणे ' असा अर्थ केल्याने **कोणतीही अडचण निर्माण होत नसली, तरी...** ' ( पहा : पूर्वोक्त : पृ. २९. ) असे म्हणताना विसंगती उत्पन्न होते, असे वाटते. कारण ' अमूक अर्थ केल्याने



अनुक्रमणिका






कोणतीही अडचण उत्पन्न होत नसली, तरी अमूकच अर्थ करावा, असे म्हणताना एखादे पुष्कळच प्रबल किंवा बिनतोड प्रमाण दिले पाहिजे. नहून, दोन्ही पक्षांचे बलाबल समान राहणार. तथापि ही विसंगती अथवा हा मुद्दा सोडून दिला, तरी ‘ तुरंबणे ’ याचा ‘ माळणे ’ हा अर्थ या सर्वच्या-सर्व ओव्यात खरोखर जुळतो काय ? आम्हाला वाटते, नाही. ते का, ते पाहू:

**९.११ :** येथे तुरुंबावे = हुंगावे हाच अर्थ घेतला पाहिजे, हे ‘ परिमले ’ या पदाने सूर्यप्रकाशाइतके स्वच्छ आहे. ‘ सुगंधाने कशाचा वास घ्यावा ? समुद्राने कोठे स्नान करावे ? सारे आकाशच अडेल असा विस्तार कोठला ? ’ असा या ओवीचा अर्थ आहे. येथे विरोधचमत्कृती आणि तज्जन्य असंभाव्यता अभिप्रेत आहे, हे अगदी उघड आहे. येथे ‘ माळणे ’ हा अर्थ कसा लागू पडणार ? येथे काय असे म्हणणार की, ‘ सुगंधाने काय **माळावे** ? ’ आणि समजा म्हटले, तर त्याचा ओवीच्या पुढील भागाशी अर्थदृष्ट्या कसा मेळ घालणार ?

**९.३८०:** येथेही तुरंबावे=हुंगावे असाच अर्थ आहे; ‘माळावे’ असा नाही. 'भक्ताने भक्तिपूर्वक मला एखादे फूल अर्पण केले, तर वास्तविक पाहता मी त्याचा सुगंध घ्यावा, पण मला त्या भक्ताविषयी त्याच्या अनन्य-भक्तीमुळे इतकी काही अनिवार प्रीती वाटते की, ते फूल मी उचलून चटकन् तोंडातच टाकतो. मला मुळी भानच राहत नाही,' असा येथला अभिप्राय आहे. येथे फुलाच्या ‘ हुंगण्या’शीच संबंध आहे, ‘ माळण्या’शी नाही. नाकाशी धरण्याऐवजी अत्यास्थेमुळे मी ते फूल तोंडातच घालतो, असा भाव. शिवाय ‘ येक फूला’च्या बाबतीत ‘माळणे’ यातील अर्थाची कल्पना जुळत नाही. एका फुलाने ते काय ‘ माळणार ’ ? ‘ माळणे ’ यात मालेप्रमाणे ( शिरोभागी ) ‘ धारण करणे ’ असा अर्थ आहे. तेव्हा येथेही ‘ माळणे ’ हा अर्थ जुळत नाही.

**१०.१८६ :** येथे ओवीच्या दुसऱ्या चरणात विरोध-चमत्कृती अथवा असंगतिचमत्कृती आहे, तिचा ओवीच्या अखेरपर्यंत संबंध आहे. या संबंधाचा पाठ-पुरावा करावयाचा, तर पुढीलप्रमाणे रोख आहे, हे स्पष्ट होईल. “ तुम्ही जे बोलला ते इतके अद्भुत, इतके विलक्षण होते की, त्यायोगे आम्हाला वाटले की, अमूर्ताला मूर्ती आली. खास एका इंद्रियाचा असलेला विषय दुसऱ्या इंद्रियाने कवळिला. आम्ही जणू काही ‘ नादा’चे डोळ्यांनी ‘ दर्शन ’ घेतले. ‘ नाद ’ हा वस्तुतः श्रुतीचा विषय; पण तो नेत्रांचा विषय झाला ![1] आणि चंदनवृक्षाला निसर्गतः फूल येत नसताही त्याला फुले बहरली, आणि आम्ही त्यांचा सुगंध घेतला. असंभाव्य अशा चंदनपुष्पांचा आम्ही गंधभोग घेतला ! हे अघटित घटनापाटव आम्ही अनुभविले[2] या ओवीचा अभिप्राय असा आहे : चंदनवृक्ष हा सुगंधासाठीच प्रसिद्ध आहे. किंबहुना, तो सुगंधच साकारलेला असतो. कविसंकेत असा की, त्याला निसर्ग-धर्मानुसार फूल येत नाही. तथापि ते निसर्गधर्मा-विरुद्ध जर आले असते, तर किती सुगंधित असते ! अशा सुगंधित पुष्पांचा आम्ही साक्षात् वास घेतला ! हा ‘ भोगिता अनुरागु ’ जाणिला ! -अशा तात्पर्यामध्ये प्रा. धोंडांचा ‘ माळणे ’ हा अर्थ कसा बसणार ? ‘ चंदनवृक्षाची फुले आम्ही **माळिली** ’ असा अर्थ केला, तर मूर्तिमंत सुगंध असलेल्या चंदनाचे सुगंधरूपी वैशिष्ट्य अर्थामध्ये खचितच गमावेल. आणि त्याचा तर येथे नितांत उपयोग आहे. तात्पर्य, येथे ‘ √ तुरंब ’ याचा ‘ हुंगणे ’ असा अर्थ घेतला, तर ओवीच्या उत्तरार्धातील दोन वैशिष्ट्यांचा परामर्श होतो.

( १ ) चंदनाला अशक्य असलेले फूल येणे, आणि

( २ ) त्या फुलाचा वास घेणे. पण ‘ माळणे ’ अथवा धारण करणे असा अर्थ केला तर ( १ ) चंद-नाला अशक्य असलेले फूल येणे या एकाच वैशिष्ट्याचा

---

१. जो ज्या इंद्रियाचा विषय नाही, तो त्या इंद्रियाचा विषय आहे, किंवा होतो, अशी चमत्कृतिपूर्ण कल्पना ज्ञानदेवीत अन्यत्रही येते. ( पहा : ६.१६-१९. )

२. अघटितघटनेचा विस्मय व्यक्त करण्यासाठी आजही आपण ‘ उंबराला फूल येणे ’ किंवा ‘ उंबराला जायफळ येणे ’ या वाक्संप्रदायांचा उपयोग करितोच. यातली गृहीत कल्पना अशी की, उंबराला फूल नसते. उंबराला जायफळ येणे शक्य नाही, हे तर उघडच आहे.



अनुक्रमणिका

परामर्श होईल, दुसऱ्या वैशिष्ट्याचा होणार नाही. नुसता ' धारण करणे ' हा अर्थ अभिप्रेत असता, तर सर्वांग सुगंधी अशा चंदनाचाच उल्लेख करण्याची आवश्यकता नव्हती. अन्य कोणताही निर्गंध, अपुष्प वृक्ष चालला असता संक्षेपतः, येथे पुढीलप्रमाणे विचार व्यक्त केला आहे :

| प्रत्यक्ष स्वरूप | | अनुभूती |
|---|---|---|
| तुमचे बोलणे | | |
| म्हणजे | | |
| नादाचे | → | दर्शन |
| [ श्रुतिविषय ] | → | [ चक्षुर्विषय ] |
| चंदनपुष्पांचा | → | गंधभोग |
| [ असंभाव्याचा ] | → | [ उपभोग ] |

**१५·५५ :** हे अश्वत्थवृक्षाचे वर्णन आहे. त्याच्या फळाचा निर्देश प्रथमचरणात, तर फुलाचा निर्देश द्वितीयचरणात आहे. फळाचा खाण्याच्या संदर्भात, तर फुलाचा उघडच हुंगण्याच्या संदर्भात तेव्हा येथे ' तुरुंबितां ' म्हणजे ' हुंगतां, वास घेता ' असाच अर्थ आहे. येथे ' चुंबितां ' हे पद लक्षात घेता ' माळतां ' असा अर्थ एकतर संदर्भोपयुक्तही नाही, आणि मार्मिकही नाही.

तात्पर्य, ९·११, ९·३८०, १०·१८६ आणि १५·५५ या चारही ओव्यात ' तुरुंब ' याचा एकच अर्थ आहे, आणि तो ' हुंगणे ' असा आहे; ' माळणे ' असा नाही. तेव्हा प्रा. धोंडांचा ' माळणे ' या एकमेव अर्थाकडे असणारा आग्रहयुक्त कल टिकणारा नाही. याच कारणास्तव या चार ओव्यांचा आम्ही एक गट केला आहे. आता, यापुढील तीन ओव्यांच्या दुसऱ्या गटाचा विचार करू :

**११·२१५ :** ही ओवी विश्वरूपवर्णनाच्या समयीची आहे. यापूर्वीच्या ११·२१४ या ओवीत अर्जुनाने त्या विश्वरूपाच्या कंठाकडे आणि मुकुटाकडे पाहिल्यावर तेथे त्याला जे दिसले, त्याचे वर्णन आहे. कंठमुकुटाच्या ठिकाणी त्याला अद्भुत फुले दिसली. त्या फुलांचे मोठे रोचक वर्णन येथे आहे. ती फुले अतिनिर्मल तर होतीच, पण ती महान् सिद्धींची आदिस्थाने होती. आता, ही फुले कंठमुकुटाच्या ठिकाणची असल्याने येथे ' तुरंबिली ' म्हणजे ' धारण केलेली ' असाच अर्थ केला पाहिजे. येथे ' तुरंब ' याचा ' वास घेणे ' असा अर्थ नाही. या बाबतीत प्रा. धोंडांचे म्हणणे यथार्थ आहे.

तथापि एक गोष्ट आवर्जून निदर्शनाला आणून दिली पाहिजे. प्रा. धोंड नेहमी ' माळणे ' असा शब्द योजितात. तो आम्हाला सर्वत्र युक्त वाटत नाही. मुकुटाच्या बाबतीत तो युक्त झाला, तरी कंठाच्या बाबतीत ' माळणे ' हा शब्द कितपत युक्त होईल, ते सांगवत नाही. खुद्द धोंडांनी ' **डोकींत** फुले माळणे ' ( जाड ठसा आमचा ) असाच अर्थ दिलेला आहे. यात ' डोकींत ', ' शिरावर ' इत्यादिकांतील कल्पना अर्थातच संदर्भानुसार आलेली आहे, हा साक्षेप ध्यानी घेतला पाहिजे. ' माळणे ' म्हणजे ' माळेप्रमाणे धारण करणे ' असाच अर्थ केला पाहिजे. एरव्ही ' कंठात ' याच्याशी त्याचा योग होणार नाही. नहून, कंठात ' डोकीत फुले माळणे ' असा काही विचित्र वाक्यप्रयोग आणि अर्थ करावा लागेल. तो तर अनिष्ट आहे. म्हणून आमच्या मते ' √ तुरंब ' म्हणजे 'माळणे' असा अर्थ न करता ' धारण करणे ' एवढाच अर्थ करावा, म्हणजे संदर्भास अनुसरून ' शिरावर ', ' कंठात ', ' हातात ' इत्यादी अर्थ अनुरूप रीतीने करिता येईल. प्रा. धोंडांनी ' माळणे म्हणजे शिरावर धारण करणे ' असा प्रथम ' धारण करणे ' याच्या आधाराने अर्थ केला, आणि मागाहून ' माळणे ' असा एवढाच शब्द वापरला आहे. ते निष्कारण अडचणीचे आहे. तात्पर्य ' √ तुरंब ' धारण करणे ( संदर्भानुसार कंठात, शिरावर, हातात इत्यादी ).

**१७·२८० :** या ओवीच्या संदर्भात सात्त्विक दानाचे वर्णन चालले आहे. फलप्राप्तीच्या अपेक्षेवाचून केलेले दान ते सात्त्विक दान, असे सांगण्याचे येथे तात्पर्य आहे. ते व्यक्त करिताना ज्या वेगवेगळ्या उपमा दिलेल्या आहेत, त्यात प्रस्तुत ओवी येते. तिचा अभिप्राय असा : ' ज्याप्रमाणे पोळाला चारा घातला, तर तो प्रत्युपकार करीत नाही. ' बूरु ' माथ्यावर ' तुरंबिला ' तर तोही प्रत्युपकार करीत नाही त्याप्रमाणे ... " आता येथे ' बूरु ' आणि ' तुरंबिला ' या पदांचे अर्थ काय ? जुन्या संपादकांनी आणि





अनुक्रमणिका

कोशकारांनी त्यांचे पुढीलप्रमाणे* अर्थ केले आहेत. त्यातून फक्त प्रा. दांडेकरांच्याच अर्थाचा धोंडांनी निर्देश केला आहे.

डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी तंजावर प्रांतातील रामकविकृत 'भाषाप्रकाश' नांवाचा एक ग्रंथ संपादिलेला आहे. प्रस्तुत 'भाषाप्रकाश' हा अनुष्टुभ-छंदातील पद्यबद्ध शब्दकोश आहे. आणि त्यात रामकवीने प्राचीन मराठी वाङ्मयातील शब्दांचे अर्थ दिलेले आहेत. या कोशात 'बुरू' याचा अर्थ 'वेडा' असा दिलेला आहे. आश्चर्य हे की, राजवाड्यांनी– आणि फक्त राजवाड्यांनीच– नेमका असाच अर्थ आपल्या कोशात दिला आहे. (– राजवाड्यांनी प्रस्तुत 'भाषाप्रकाश' पाहिला होता काय? –) प्रस्तुत 'भाषाप्रकाश'तील संबद्ध ओळ अशी :

'वेड्या सखें वेडसर वेडें तेंच पिसें बुरू' –

– भाषाप्रकाश : ११. ११. (पृ. ६९.)

प्रा. धोंडांनी 'बूरु' याचा 'बोरू' असा एक नवीन अर्थ सुचविला आहे. आणि 'बूरु तुरंबिला' = बोरु माळला असा अर्थ करून पूर्वी ज्ञानेश्वरांच्या काळी भरदार केस वा शेंडी असलेले लेखक केसांची वा शेंडीची गाठ मारून त्या केसात लेखणी खोवून ठेवीत असावेत,' असे अनुमान केले आहे. पण 'बूरु' याचा 'बोरू' असा अर्थ करण्याला त्यांना आधार देता आला नाही.

उलटपक्षी, 'बूर्' ('उ' हा प्रथमावाचक एकवचनी प्रत्यय) म्हणजे 'वाईट', 'क्रूज' 'रोगविशेष' असे अर्थ सर्व संपादकांनी व कोशकारांनी दिलेले आहेत. बुरा, बुरी, बुरशी, बुरसणे, (भला) बुरा, बुरू (= वाईट साखर) इत्यादी किती तरी सदृश्य शब्द दिले आहेत. 'कृतघ्न मनुष्य' हा अर्थ 'वाईट' यापासून लक्षणेचा आश्रय करून सहज काढिता येईल. आणि प्रस्तुत ओवीत 'न करी प्रत्योपकारु' या संदर्भात तर तो चपखलपणाने बसतो. असे असल्यामुळे दांडेकरांच्या निमित्ताने प्रा. धोंडांनी जे वादाडे मारिले आहेत, ते या ठिकाणी तरी बसण्यासारखे नाहीत.

✓ तुरंब याचा मात्र धोंडांनी केलेला अर्थ हाच ग्राह्य आहे आणि तो अर्थ काही कोशकारांनी दिलेलाही आहे, हे दिसून येईल. तेव्हा 'बूर' = वाईट, कृतघ्न आणि '✓' तुरंब' = धारण करणे असा अर्थ करून या ओवीचा अर्थ पुढीलप्रमाणे करावा : 'किंवा पोळाला चारा घातला, (किंवा) कृतघ्नाला डोक्यावर घेतले (म्हणजे– त्याचा मोठा गौरव केला, तरी) तो ज्या-प्रमाणे प्रत्युपकार करीत नाही, ... ' जाता-जाता हे ध्यानी ठेवावे की, प्रा. धोंड 'बूर' हे नाम मानितात. अन्य टीकाकार ते विशेषण मानितात, आणि त्याचा येथे नामवत् प्रयोग समजतात.

| * बूरु | तुरंबणे | संपादक |
|---|---|---|
| बुरा, कृतघ्न | पूजिला (टीपेत) | –साखरे, कुंटे |
| बुरा, कृतघ्न | बहुमान दिलेला | –भिडे |
| कृतघ्न मनुष्य | (प्रेमाने) हुंगिले | –दांडेकर |
| बुरा, कृतघ्न, वेडा (?) | वास घेणे, मस्तकावर ठेवणे–धारण करणे, खोवणे. | — माडगावकर |
| वेडा | (१) अंगावर वस्तु धारण करण्याने समाधान होणे; (२) सुगंधाने तृप्त होणे. | — राजवाडे |
| कृतघ्न | ,, ,, | — कृ. पां. कुलकर्णी |
| Ungrateful person, bad | Smell | — पानसे |
| कृतघ्न | वास घेणे, धारण करणे | — भावे |
| वेडा, कृतघ्न | वास घेणे, डोक्यावर खोवणे, कांडणे | — वेलिंगकर |
| वाईट, कृतघ्न | घालणे, खोवणे, मस्तकावर–धारण करणे, हुंगणे, इ. | — महाराष्ट्र–शब्दकोश |










अनुक्रमणिका

**१८·८१९ :** येथे '√ तुरंब' याचा 'धारण करणे' ( -प्रा. धोंड समजतात त्याप्रमाणे 'माळणे' नव्हे, ) असाच अर्थ आहे, हे स्पष्ट आहे. प्रा. धोंडांनी फक्त दांडेकरांचाच अर्थ पाहिलेला दिसतो. परंतु तुकाराम तात्या ( सन १८९७ ), साखरे, भिडे, व्य. ग्यं. चाफेकर आणि कुंटे यांनी '√ तुरंब' याचा धारण करणे असाच अर्थ केलेला आहे. अर्थात् या अर्थाला प्रस्तुत ओवीत बळकटी येते.

तात्पर्य, ११·२१५, १७·२८० आणि १८·८१९ या तिन्ही ओव्यांत '√ तुरंब' याचा एकच अर्थ आहे, आणि तो 'धारण करणे' असा आहे; 'माळणे' असा नाही. 'धारण करणे' आणि 'माळणे' यांतील सूक्ष्म भेद पूर्वी सांगितलाच. तेव्हा प्रा. धोंडांचा 'माळणे' असा अर्थ अनुकूल रीत्या फिरवून 'धारण करणे' असा केला, तर प्रा. धोंड यांच्या आणि आमच्या उपपादनात, काही किरकोळ स्थळे सोडिल्यास, भेद नाही, असे आढळून येईल. याच कारणास्तव या तीन ओव्यांचा आम्ही एक गट केला आहे. आता यापुढील तिसऱ्या गटाचा विचार करू :

**१६·३९ :** येथे गुरुगौरवपर व्याख्यान चालू आहे. आणि ज्ञानदेव गुरूंना उद्देशून म्हणत आहेत की, 'मी गीतेचे व्याख्यान करू पाहत आहे, ते म्हणजे खरोखर आकाशपुष्पाचा वास घेणे होय, ( किंवा आकाशपुष्पाचे धारण करणे होय, ) पण आपण असे समर्थ आहा की, आपण माझी तीही हौस फेडून टाकिली अर्थात् आपण मला गीताव्याख्यानाला प्रवृत्तही केले. आणि समर्थही केले. अलंकाराने बोलावयाचे तर आपण मजकडून आकाशपुष्पाचा वास घेवविला, अथवा आकाशपुष्प धारण करविले ! येथे 'तुरंबणी' हे '√ तुरंब' पासून नाम आहे, आणि त्याचे (अर्थात् 'तुरंबणी' या नामाचे) दोन्ही अर्थ शक्य आहेत : ( १ ) वास घेणे, हुंगणे आणि ( २ ) धारण करणे, खोवणे. येथे फक्त 'माळणे' असा एकदेशी अर्थ करणे सयुक्तिक नाही. कारण संदर्भास दोन्ही अर्थ चपखल जुळतात.

**१६·३६१ :** येथे आसुर-प्रकृती लोकांचे वर्णन चालू आहे; आणि त्यांचा अधिक्षेप अभिप्रेत आहे. तो अभिप्राय असा : 'फार काय सांगू ? असे ते आसुरस्वभावी लोक इतके वेडे असतात की, ते ( आसुरप्रकृती ) मोठ्या असोशीने आकाश पुष्पाचाच वास घेतात (किंवा आकाशपुष्प धारण करितात).' येथे '√ तुरंब' याचे वरीलप्रमाणेच दोन अर्थ संभवतात. कारण दोन्ही स्थळी ( १६·३९ आणि १६·३६१ 'तुरंब' आकाशपुष्पाच्या संदर्भात योजिलेला आहे.

**१७·३४० :** येथे 'ॐ-तत्-सत्' या त्रिधास्वरूप ब्रह्मनामाचे रोचक वर्णन चालू आहे. "ॐ-तत्-सत्' हे ब्रह्माचे प्रतीक नाम असून ते त्रिधारूप आहे. असे ते ब्रह्मनाम म्हणजे उपनिषद्‌रूपी महान वृक्षाचे अतिसुंदर फूल आहे. त्या ह्या सुंदर फुलाचा तू वास घे. ( किंवा-ते सुंदर फूल तू धारण कर.)" येथे आशय असा आहे : "फूल हे वृक्षाचे फळापूर्वीचे लगतचे स्वरूप आहे. तेव्हा वृक्षाचे समग्र स्वरूप, सर्व रस फुलाच्या ठायी एकवटलेला असतो. त्यातूनच पुढे फलोत्पत्ती होते. येथे उपनिषदांच्या संदर्भात मिळावयाचे फळ मोक्ष हे आहे. तेव्हा मोक्षसाधनेसाठी या उपनिषद्-वृक्षाच्या त्रिधास्वरूप फुलाचा तू सुगंध घे. ( किंवा-ते फूल धारण कर.) वृक्षाच्या मानाने फुलाचा आकार हा नेहमीच लहान असतो. वृक्षाच्या आंतर रसाचा समग्र गंधही त्याच्या ठायीच एकवटतो, आणि तोच पुढे फलात संक्रांत होतो. प्रस्तुत ठिकाणी ब्रह्मनामाचे स्वरूपही तसेच आहे. हे ॐ तत्सदाकार ब्रह्मनाम खरोखर किती लहान आहे ! उपनिषदांच्या भव्य विस्ताराच्या मानाने तर फारच लहान. पण त्याचा महिमा मात्र फार मोठा आहे. कारण उपनिषद्विचारांचे सारसर्वस्व त्या ब्रह्मनामात एकवटलेले आहे. अशा त्या लहान असूनही महत्तम ठरणाऱ्या ब्रह्मनामाचा महिमा तू नीट जाणून घे; तो मनात साठवून ठेव; त्याचे मनन कर." आता येथे 'तुरंबी' हे √ तुरंब याचे आज्ञार्थाचे द्वितीयपुरुषी एकवचन आहे. त्याचा 'धारण करणे' असाही अर्थ करिता येईल. प्रा. धोंडांनी 'तुरंबी' हे नाम घ्यावे ( -अर्थातच स्त्रीलिंगी असे आम्ही समजतो, - ) असे सुचविलेले आहे. अर्थ 'मंजरी'. त्यांनी प्रस्तुत ( १७·३४० ) ओवीचा, आणि विशेषतः उत्तरार्धाचा, अन्वय दिला असता, तर बरे झाले असते. आम्ही असे म्हणतो याचे कारण असे की, 'तुरंबी' हे नाम








घेतल्यास अन्वय दुर्घट, क्लिष्ट आणि आडवळणी झाल्यावाचून राहणार नाही, असा आमचा कयास आहे. शिवाय, 'तुरंबी' म्हणजे 'मंजरी'. पण 'मंजरी' म्हणजे तरी अखेरीस फूलच ना? 'तुळशीची मंजरी झाली तरी ते तुळशीचे फूलच! मग 'तुरंबी' (= मंजरी) आणि 'फूल' या दोन पदांचा मेळ पुनरुक्ति न करता कसा घालणार? तसेच, 'उपनिषदाते' या पदाचा अन्वय कसा करणार? आम्हाला असे निश्चयाने वाटते की, येथे 'तुरंबी' हे नाम घेता येणार नाही. ते क्रियापदच घेतले पाहिजे. प्रा. धोंडांनी आणखी एक पर्याय सुचविला आहे. ते म्हणतात, "'तुरंबी' हे क्रियापदाचे रूपच व्यावयाचे असल्यास त्याचा 'तुरंबीप्रमाणे शोभणे' असाही अर्थ घेता येईल." (पहा : पूर्वोक्त लेख : पृ. २७). आम्हाला वाटते की, असा अकर्मक धातूचा अर्थ घेता येणार नाही. तो मग सकर्मक धातु मानावा लागेल; आणि 'तुरंबीप्रमाणे **शोभविणे**' असा अर्थ करावा लागेल. तरीही 'फूल' आणि 'तुरंबी' (= मंजरी) यांतील पुनरुक्ती टाळिता येणार नाहीच. पण तुरंब याचा 'वास घेणे', 'हुंगणे' हा अर्थ टाळण्यासाठी आणि 'शिरोभागी धारण करणे' हाच अर्थ पतकरण्यासाठी अशा खटाटोपाची खरोखरी काही आवश्यकता नाही. ✓ 'तुरंब' याचा 'हुंगणे' हा अर्थ अनेकदा निर्विवादपणे येताना आढळतो, तर तो का टाळावयाचा? आणि त्यासाठी वेलवेलांट्या का मारावयाच्या? तसे करण्याची काही आवश्यकता नाही.

प्रस्तुत १७.३४० या ओवीत काही आवृत्त्यांमध्ये पाठभेद आढळतात. त्यांचा विचार करणे जरूर आहे; आणि त्या ओवीचा अन्वयार्थ कसा करावयाचा, तेही पाहणे आवश्यक आहे. भाषादिकांच्या दृष्टीनी राजवाडे यांच्या आवृत्तीतील पाठ उपलब्ध प्रतीत सर्वात प्राचीन असल्याकारणाने आम्ही राजवाडे–पाठाचा स्वीकार करणारे आहो. तदनुसार प्रस्तुत ओवीचा अन्वय आणि अर्थ असा : 'एवं ॐ तत्सदाकार। ब्रह्मनाम ते त्रिप्रकार। ते हे उपनिषदा सुंदर। फूल तुरंबी' आपल्या अर्थाच्या धोरणानुसार पदच्छेद करण्यास प्रत्येक संपादक स्वायत्त असल्याने आणि प्राचीन पोथ्यात सर्वच लेखन पदच्छेदावाचून सलगच लिहिण्यात येत असल्याने आम्ही चतुर्थचरणात 'उपनिषदा ते' असा पदच्छेद करितो. असाच पदच्छेद मूळ माडगावकर प्रतीत आहेही, 'उपनिषदा' हे षष्ठ्यन्त पद असून त्याचा संबंध 'फूल' या पदाशी आहे. अर्थ : अशा प्रकारे 'ॐ –तत्-सत्'– स्वरूपी ब्रह्माचे नाव त्रिधा आहे. (तेव्हा) त्या ह्या उपनिषद्रूपी (किंवा उपनिषदांच्या) सुंदर फुलाचा तू वास घे (**किंवा** ते हे ... फूल धारण कर.)' येथे चतुर्थचरणात पुढीलप्रमाणे पाठभेद आहेत :

उपनिषदाचें – साखरे, भिडे, माडगावकर (टीप), पंगु

उपनिषदातें – कुंटे (टीप).

उपनिषदातें – थिगळे, माडगावकर (टीप).

उपनिषदा तें – माडगावकर (मूळ).

उपनिषदतें – नारायण रामचंद्र सोहनी (सन १८९०)

उपनिषद तें – कुंटे (मूळ) (सन १८९४), तुकाराम तात्या (सन १८९७), केरळकोकिळ (सन १९००), व्यं. त्र्यं. चाफेकर, गोपालाश्रम, बरवा, दांडेकर.

या विविध पाठभेदांवरून असे दिसून येईल की,

(१) 'उपनिषदाचें' हा पाठ सुगमीकृत (Lectio Simplicior) आहे.

(२) 'उपनिषदा (दां) तें' या पाठाचा पदच्छेद केल्याशिवाय त्याचा अन्वयार्थ दुर्घट, किंबहुना अशक्य आहे. माडगावकर (मूळ)-प्रतीचा त्या पदच्छेदाला आधार आहे.

(३) 'उपनिषदतें' (सोहनीपाठ) या पाठाचा अन्वय अशक्य आहे.

(४) 'उपनिषद तें' याचाही अन्वय अशक्य आहे. दांडेकरांनी 'ह्या सुंदर फुलाचा उपनिषदें वास घेतात,' असा अर्थ केला आहे. पण तो व्याकरणदृष्ट्या चुकीचा आहे. कारण त्यांच्या पक्षी 'उपनिषद' हा कर्ता अनेकवचनी आणि 'तुरंबी' हे क्रियापद एकवचनी अशी ठार विसंगती उत्पन्न होते. फार तर 'उपनिषद् त्या सुंदर फुलाचा वास घेते' असा केवळ **व्याकरणदृष्ट्या** निर्दोष अर्थ होईल. परंतु हे म्हणण्यात संदर्भतः कांही औचित्य नाही. कारण हे सर्व साधकाला सांगण्याचे तात्पर्य आहे.

(५) प्रा. धोंडांनी जे विवरण केले आहे; त्यावरून त्यांचा अन्वय-अर्थ असा दिसतो; हे सुंदर फू










उपनिषदांते तुरंबी. अर्थ : हे सुंदर फूल म्हणजे उपनिषदांची मंजिरी होय. ' येथे (क) ज्ञानदेवीभाषेच्या वळणानुसार ' उपनिषदांते ' असे जे चतुर्थ्यन्त पद आहे. त्याच्या ऐवजी षष्ठ्यन्त पद पाहिजे. (ख) ' फूल ' आणि ' मंजिरी ' यांच्या अर्थकल्पनेत पुनरुक्ती होते. (ग) ब्रह्मनामाला एकदा ' फूल ' म्हटल्यावर पुन्हा त्यालाच त्याच वाक्यात ' मंजिरी ' म्हणण्याचा प्रसंग येतो. म्हणजे एका अलंकाराने दुसऱ्या अलंकाराचा लोप घडतो.

(६) या कारणास्तव आम्ही केलेला अन्वय आणि अर्थ व्याकरणदृष्ट्या सुघट आणि अर्थदृष्ट्या सुश्लिष्ट आहेत, हे उघड होईल. याचे विवेचन वर केलेच आहे.

महानुभाव-वाङ्मयांत ' √ तुरंब ' आणि ' तुरंबी ' (स्त्री.) येतात. ती स्थळे पुढीलप्रमाणे :

(१) वीळासाची फुले सुपरीमळे :
माथां तुरंबीलीं मळयानीळे
मूर्तिप्रकाशः मुनि केशिराज : १३९०.

(२) जो कैवल्यकुसुमाचा परीमळु :
माथां तुरंबी मुनो
मळ्यानीळु-मूर्तिप्रकाशः मुनि केशिराज : १४१२.

(३) फुले तुरंबीती मोगरी जाइया : बासींगें नोवरेया :
बांधिताति :—मातृकी-रुक्मिणी-स्वयंवरः ५६.
महदंबा (आद्य मराठी कवयित्री).

(४) सोंकरिताति तुरंबीयावरी :
पुंसेयातें — शिशुपालवध :
भास्करभट्ट बोरीकर : २५५.

पूर्वोक्त ' भाषा प्रकाशात ' ' √तुरंब ' याचा अर्थ पुढीलप्रमाणे दिलेला आहे :

' तुरंब्रिलें तुऱ्या ऐसें धरिलें वाहिलें तसें
— भाषाप्रकाश :
रामकवी : १८–११९. (पृ. १०४)

प्रा. धोंडांच्या लेखात व्युत्पत्तीचा विचार दिसला नाही. ' तुरंब ' याची व्युत्पत्ती राजवाड्यांनी आपल्या ' धातुकोशा'त पुढीलप्रमाणे दिली आहे : "तृप् (म्पू); तृफ् (म्फ्). **तृप् प्रीणने म्ह० संतुष्ट करणे ह्यावरून तुरंबणे म्ह० सुवासाने संतुष्ट होणे, वास घेणे असा अर्थ करितात. मूलार्थ फक्त संतुष्ट करणे एवढाच आहे। मस्तकावर ठेवणे, बांधणे हेही मूलार्थ नव्हत, साधित अर्थ आहेत.**" कृ. पां. कुलकर्णी यांनी आपल्या ' मराठी व्युत्पत्तिकोशा'त राजवाड्यांचाच अनुवाद केला आहे. आणि मोनियर वुइल्यम्स् याच्या संस्कृत कोशातही ' √ तृप् (म्प्) ' ' √ तृफ् (म्फ्) ' याचे अर्थ ' To be satisfied ' इत्यादी असेच दिलेले आहेत. यावरून असे दिसते की, ' तृप् (म्प्), ' ' तृफ् (म्फ्) ' यांचे रूढीने दोन अर्थ आले : (१) (वास घेऊन) संतुष्ट होणे, आणि (२) (अंगावर एखादी वस्तु धारण करून) संतुष्ट होणे. √ तृप् (म्प्) √ तृफ् (म्फ्) > √ तुरंब अशा साधनिकेवरून ' तुरंब ' याच्याही ठिकाणी वरील दोन्ही अर्थ मानिले पाहिजेत, हे स्पष्ट आहे.

यापूर्वी या संदर्भातील ज्ञानदेवीतल्या दहा ओव्यांची अवतरणे देताना आम्ही त्यांचे तीन गट केलेले होते ते गट कसे साभिप्राय आहेत, हे आता ध्यानी येईल. **पहिल्या गटात** ' √ तुरंब ' याचा ' वास घेणे ' असाच केवळ अर्थ आहे. **दुसऱ्या गटात** √ तुरुंब ' याचा ' धारण करणे ' असाच केवळ अर्थ आहे. म्हणजे हे दोन गट अर्थदृष्ट्या परस्परव्यावृत्त आहेत. आणि **तिसऱ्या गटात** ' √ तुरंब ' याचे वरील दोन्ही अर्थ होऊ शकतात.

यातूनच आणखी एक मुद्दा आम्हांला निदर्शनास आणावयाचा आहे. या तीन गटात जो वरील धातू आलेला आहे, त्याकडे काळजीपूर्वक लक्ष दिले असता असे दिसेल की, त्याच्या स्वरूपात ध्वनिदृष्ट्या आणि अर्थदृष्ट्या एक सूक्ष्म पण महत्त्वाचा भेद आहे. गट (१) यात ' तुरुंब ' असा धातु आहे तर गट (२) व (३) यात ' तुरंब ' असा धातू आहे. फलतः, √ तुरंब = वास घेणे.

√ तुरंब= (१) धारण करणे; (२) वास घेणे. म्हणजेच ' √ तुरंब ' याचा ' धारण करणे ' असा अर्थ ज्ञानदेवीत कोठेही नाही, पण ' √ तुरंब ' याचे मात्र ' धारण करणे ' आणि ' वास घेणे ' असे दोन्ही अर्थ आहेत. तथापि ' √ तुरंब '= धारण करणे हा बहुप्रयुक्त आहे. त्या मानाने ' √ तुरंब ' = वास घेणे हा अल्पप्रयुक्त आहे. आणि जेथे तो मिळतो, तेथे त्याचा ' धारण करणे ' हाही अर्थ संभवतो.













अनुक्रमणिका

प्रा. अ. मि. शहा

# नियोजन– लोकशाहीसाठीच !

नवभारताच्या "नेहरू- विशेषांकात' 'पंडितजींची समाजवादाची कल्पना' हा मी लेख लिहिला होता. त्यावर श्री. का. म. गावस्कर ह्यानी काही आक्षेप घेतले आहेत. [ "योजनेतील अग्रक्रमाचा प्रश्न', नवभारत फेब्रुवारी १९६५ ] त्या अनुषंगाने खालील लेख लिहिला आहे.

नियोजनाच्या पाठीराख्यांमध्ये आणि विरोधकांमध्ये नियोजनाबाबत जो प्रचलित समज आहे त्याचा ऊहापोह न करता 'नियोजन' हे लोकशाहीला नुसतेच सुसंगत नसून हुकूमशाहीपेक्षा जास्त आवश्यक कसे आहे ह्याचे विस्तृत विवेचन ह्या लेखात करण्याचे मी ठरविले आहे. कायद्याचे व्यक्तिस्वातंत्र्याला साधक आणि बाधक असे ज्याप्रमाणे प्रकार असू शकतात तद्वतच नियोजनाचेही विविध प्रकार असतात हे ह्या ठिकाणी मी नमूद करतो. सोव्हियट रशियाच्या आर्थिक व्यवस्थेचा अभ्यास केल्यानंतर 'नियोजन' हे व्यक्तिस्वातंत्र्याला जखडणारे आणि सामाजिक सुबत्तेला नियामक बनू शकते हे दिसून येते. आणि ह्याच (रशियन धार्जिण्या) नियोजनाचा, नियोजन, नियोजन म्हणून बऱ्हंशी गवगवा करण्यात येतो, आधुनिक लोकशाही ज्या मूल्यावर जोपासली गेली आहे त्या मूल्यांना अनुकूल असेही नियोजन असू शकते ह्याची बऱ्याच महाभागांना पुसटशी जाणीव देखील नसते.

### लोकशाहीची मूल्ये

मला अभिप्रेत असलेल्या लोकशाही मूल्यांची थोडक्यात कल्पना, इ. स. १७७६ साली झालेल्या 'अमेरिकन राज्यक्रांती' च्या नेत्यांनी संमत केलेल्या स्वातंत्र्य–जाहीरनाम्यातील [ Declaration of Independence ] खालील ओळीवरून येईल. त्यांत म्हटले आहे, "आम्ही (अमेरिकन राज्यक्रांतीचे नेते) पुढील स्वयंप्रमाणित सत्ये मान्य करतो की सर्व मानव समान (equal) आहेत. आणि त्यांना जीविताधिकार (life), व्यक्तिस्वातंत्र्य (Liberty) आणि सौख्य शोध (Pursuit of happiness) ह्यासारखे मूलभूत हक्क सृष्टिकर्त्याने दिले आहेत. हे मूलभूत हक्क मिळविण्यासाठी शासित (governed) व्यक्तींच्या संमतीने काही व्यक्तींचे शासन (Government) बनविण्यांत येऊन त्यांच्याच संमतीने शासनाला विशेषाधिकार दिले जावेत. अशा शासनाच्या नियंत्रणामुळे जर वरील मूलभूत हक्काची पायमल्ली होत असेल तर ते शासन बदलण्याचा वा नामशेष करून नवे शासन उभारण्याचा लोकाना अधिकार राहील. आणि हे नवे शासन वर दिलेल्या मूलभूत हक्कांची जोपासना करणारे, समाजाचे संरक्षण करणारे आणि समाजाच्या स्वास्थ्यवाढीस हातभार लावणारे असेल."

वरील उद्धृत उतारा मानवी हक्कांची जोपासना, शासनाचे प्रयोजन, आणि मानवी हक्कांची गळचेपी करणाऱ्या शासनाची उचलबांगडी करण्याचा अनुशासित लोकांचा अधिकार ह्या लोकशाहीच्या राजकीय तत्त्वज्ञानाची कल्पना वरील उताऱ्यावरून यावी. व्यक्तिस्वातंत्र्य आणि संघटना ह्यातील विरोध; वैयक्तिक कर्तृत्व (Personal Initiative) आणि शासनप्रणीत नियोजन ह्यांमधील झगडा कसा मिटविता येईल हेही वरील उताऱ्यात सूचित होते. सर्व मानव जर समान आहेत आणि जीविताधिकार, व्यक्तिस्वातंत्र्य आणि सौख्यशोध हे मूलभूत हक्क हस्तगत करण्यासाठी लोकांचेच शासन असल्यावर शासनाचे सुकाणू कोणत्या दिशेने जावे हे सांगण्याची जरूरी नाही. म्हणजेच लोकशाही समाजरचनेची मूल्ये आणि तत्त्वे ह्यांच्या जाणिवेला मूर्तस्वरूप देता येईल अशी धोरणे आणि नीती सरकारने (State) अंगिकारली पाहिजेत. व्यक्तिस्वातंत्र्यावर गदा न आणता त्याचे साधन होऊ शकेल अशा सामाजिक व्यवस्थेला अनुशासनाने उत्तेजन दिले पाहिजे. शासनाने म्हणून अशा प्रकारच्या नियोजनाचा स्वीकार करावा की ज्यामुळे वैयक्तिक कर्तृत्वाला वाव मिळून अधिक संपन्न, अधिक

सुसंस्कृत असा समाज निर्माण होईल. अशा प्रकारच्या समाजरचनेत साहजिकच सर्वसामान्य माणसाला देखील स्वातंत्र्य–भावनेचा अनुभव घेता येईल.

## लोकशाही शासनपद्धतीत नियोजनाचे स्थान

वरील विवेचन 'नियोजन' लोकशाहीला साधक असल्याचे सिद्ध करण्यास जरी पुरेसे असले तरी लोकशाहीला त्याची आवश्यकता असतेच हे सिद्ध करण्यास अपुरे पडते. लोकशाहीला नियोजनाची आवश्यकता आहेच ह्याचे स्पष्ट प्रतिपादन न केल्यामुळे व्यक्तिस्वातंत्र्याला बाध न आणता जे जे शक्य आहे ते ते सर्व शासनाने केलेच पाहिजे का हा तर्कशुद्ध विचार आपल्यापुढे उभा राहतो आणि शासनाने त्या दिशेने जर पावले टाकली तर शासनाच्या हातात जास्त सत्ता केंद्रित होते. शासनाच्या हातात राजकीय आणि आर्थिक सत्ता एकत्रिक झाल्यानंतर सत्तेच्याच युक्तिवादाचा उपयोग करून असे म्हणता येईल की अशी सत्ता वैयक्तिक कर्तृत्वाला आणि स्वातंत्र्य भावनेला तडे पाडण्यास कारणीभूत होईल. त्यामुळे 'नियोजना'चा– मग ते लोकशाहीला पोषक असले तरीही – लोकशाहीच्या वाढीसाठी गरज असेल तरच शासनाने स्वीकार करावा; आणि असे असताना देखील शासनाने कमीत कमी ढवळाढवळ करण्याचे बंधन स्वतःवर घालून घेतले पाहिजे.

वरील मुद्यात बरेचसे तथ्य आहे. आपणास विदित असलेल्या नियोजित– आर्थिक व्यवस्थेकडे पाहिले की वरील मुद्याला त्यामुळे ज्यास्तच बळकटी येते. अशा प्रकारच्या नियोजनात उत्पादनामध्ये वाढ करून सामाजिक रचनेचा फायदा स्वतःच्या स्वार्थासाठी कोणाला न घेऊ देता, आर्थिक विषमता, दारिद्य कमी होऊन सर्वसाधारण नागरिकाचे जीवनमान उच्च व्हावे म्हणून सर्व सत्ता शासनाच्या हातात केंद्रित करण्यात आली. प्रत्यक्षात मात्र शासनाने सर्वसाधारण नागरिकावर जुलूम केला, त्याला तिरस्काराने वागविले, एवढेच नव्हे तर त्याची स्वार्थीप्रवृत्ती विकोपास नेली आणि त्याचा उपयोग स्वदेशातील लोकांची पायमल्ली करण्याकडे आणि अन्य देशावर आक्रमण करण्यासाठी युद्धबळ वाढविण्याकडे करून घेतला. अशा प्रकारच्या नियोजनामुळे उत्पादनक्षमताही कमी होते आणि औद्योगिक प्रगतीचा पाया असलेल्या शेती धंद्याकडे अक्षम्य दुर्लक्ष केले जाते. आणि ह्या सर्व गोष्टींचा परिपाक म्हणून देशाची आर्थिक प्रगती किमान पातळीवर येऊन घसरते. हुकूमशाही नियोजनाचा अपरिहार्य परिणाम म्हणूनच मार्क्स् आणि एंजल्स् ह्यांना अभिप्रेत असलेला समाजवाद बाजूला पडतो आणि त्याची जागा अकार्यक्षम, निष्ठुर आणि स्वतःची पाशवी सत्ता अबाधित राखण्याचा प्रयत्न करणारी शासनाची भांडवलशाही घेते. रशियाचे उदाहरण ह्या संदर्भात फार उद्बोधक होईल. जवळजवळ गेल्या पस्तीस वर्षांपासून रशियाने नियोजनाचा स्वीकार केला आहे. इ. स. १९६१ साली रशियात पन्नास कोटी एकर जमीन लागवडीखाली होती. भारतात मात्र अवघी तेहतीस कोटी एकर जमीन लागवडीयोग्य होती. भारताची लोकसंख्या रशियाच्या लोकसंख्येपेक्षा दुप्पटीने आहे. आणि काही काळापर्यंत रशिया अन्नधान्याची निर्यात करत असे. असे असून देखील १९६४ साली मात्र भारताने वर्षाकाठी जेवढे अन्नधान्य परदेशातून मागविले त्याच्या दुप्पट धान्य रशियाला एकाच वर्षाविधीत आयात करावे लागले. आणि एवढ्यावरच संपलेले नाही. रशियात आता तर पादत्राणे, कपडे, फळफळावळ, राहण्यासाठी घरे ह्यासारख्या आवश्यक वस्तूंचादेखील तुटवडा पडत चालला आहे. वरील जीवनावश्यक वस्तूंची टंचाई इतकी वाढली आहे की शासनाचे तुणतुणे वाजवणारी शासकीय वर्तमानपत्रे देखील ह्या संबंधीची माहिती वाचकापासून दडवून ठेवण्याचे शहाणपणाचे समजत नाहीत. चीन वा अन्यत्र साम्यवादी देशामधील परिस्थिती ह्यापेक्षाही बिकट आहे. आणि तरीदेखील हुकूमशाहीपेक्षा लोकशाहीलाच नियोजनाची अधिक निकड आहे असे प्रस्तुत लेखाचे मध्यसूत्र आहे. विकल्पासाठी ( Alternative ends ) संपत्तीची वाटणी हेच सर्व प्रकारच्या नियोजनांचे आर्थिक अंग म्हणता येईल पण विमुक्त समाजरचनेला प्रेरणा देणारी दृष्टी ही अधिक डोळस, सर्व बाजूंचा विचार करणारी असते तर हुकूमशाही समाजव्यवस्थेत शासनाची दृष्टी अंध असते. आणि सामर्थ्यशाली राष्ट्र आणि विपुल युद्धसामुग्री ह्याकडेच त्यांचे लक्ष असते. त्यांना व्यक्ती म्हणजे एक मामुली साधन









अनुक्रमणिका

वाटते. ज्या उद्दिष्टांच्या साध्यासाठी सारी शासनयंत्रणा राबविण्यात येते, त्यासंबंधी ध्येयधोरण ठरविण्याकरिता समाजातील घटक व्यक्तींना विश्वासात घेण्याची त्यांना कधीच गरज वाटत नाही. त्यांचा जीवनाबद्दलचा दृष्टिकोन अत्यंत विकृत आणि कामचलाऊ असतो. व्यक्तीकडे ' मनुष्य ' म्हणून न पाहता त्याचा साध्य-प्राप्तीसाठी उपयोग करून घेण्यातच ते स्वतःला धन्य मानतात. आणि अशा ग्राम्य, उपयुक्ततावादी शासनाची उन्मत्त सत्ता सगळीकडे चालते. आर्थिक ध्येय-धोरण, कायदा, सुव्यवस्था, शिक्षण, कला, वाङ्मय एवढेच नव्हे तर प्रेम, मैत्री, गृहकलह ह्यात देखील ते आपली अरेरावी करीत असते. लोकांची संमती असो वा नसो, समाजजीवनाच्या हरएक क्षेत्रात आपली अमानुष सत्ता ते प्रस्थापित करते. अशी जुलमी शासनयंत्रणा मानवी मूल्यांची पायमल्ली करीत असले तरीदेखील बिचाऱ्या समाज-घटकाला ती यंत्रणा बदलण्याचा वा झुगारून देण्याचा अधिकार राहत नाही. आणि ह्याच कारणास्तव हुकूमशहाने अमलात आणलेले नियोजन हे अधिक सुलभ आणि बरेच सरळ असते. तसेच तसल्या नियोजनाची अंमलबजावणी देखील फार सहज करता येते. आर्थिक व्यवस्थेला गरज लागेल तेव्हा मेंढरांसारखा माणसांचा उत्पादनाचा एक गुणक [ factor of production ] म्हणूनच उपयोग करण्याचे त्यांना माहीत असते. चीनमधील commune मध्ये वंशपरंपरागत चालत आलेल्या कुटुंब-पद्धतीचा ह्या कारणास्तव दंडुकेशाहीत मोड करण्यात आल्याची येथे नोंद घेतली जावी. ह्याच्या नेमके उलट लोकशाहीत भौतिक आणि सांस्कृतिक बाबींचा एक सुसंवाद राखला जाऊन सर्वसाधारण मनुष्यदेखील स्वातंत्र्य, जीविताधिकार, सौख्यशोध आदी मूलभूत हक्कांचा दैनंदिन अनुभव घेऊ शकतो. ह्यामुळेच दारिद्र्य, स्वार्थवृत्ती, विषमता, अंधश्रद्धा, अज्ञान ह्या सर्व आघाड्यांवर लोकशाहीला लढा द्यावा लागतो. एवढेच नव्हे तर, माणसामाणसातील रुचिभिन्नता, मानवी स्वभावातील स्वच्छंदीपणा, सामुदायिक जबाबदारी टाळण्याची जबरदस्त प्रवृत्ती ह्या विरुद्धही झगडा द्यावा लागतो. कर्तृत्वहीन, अकार्यक्षम अशा शासनापासून लोकांचे लक्ष विकेंद्रित व्हावे म्हणून हुकूमशाही ज्या अपरिपक्व सामाजिक परिस्थितीचा फायदा घेते त्याच्या अभावाविरुद्धही लोकशाहीला तोंड देणे आवश्यक असते. लोकशाहीसाठी ह्या सर्व अडचणी आहेत, तरीही लोकशाही समाज-रचनेतच सामाजिक नैतिक मूल्यांची जोपासना करणाऱ्या सुसंस्कृत, स्वतंत्र व्यक्तींच्या सामुदायिक प्रयत्नांमुळे, त्यांच्या आत्यंतिक श्रमांमुळे भौतिक, सुसंस्कृत आणि संपन्न असा समाज निर्माण होऊ शकतो. किंबहुना लोकशाहीतच समाजाला विशिष्ट असे चांगले वळण देता येते. म्हणूनच हुकूमशहांनी ज्या मार्गाचा अवलंब केला त्यामानाने लोकशाही मार्ग निसंशयपणे दुष्कर आणि दुःसाध्य असा बनतो. भगवान् प्रजापतींनी - जीवनशास्त्रासंबंधी जे कार्य तडीस नेले त्या कार्याला सामाजिक आणि सांस्कृतिक पातळी-वरून चालना मिळण्यास लोकशाहीच प्रेरणादायक ठरते. मानवाने अवगत केलेल्या ज्ञानाच्या भांडारांवर आणि मानवी स्वभावाला मानवेल अशा लोकशाही साधनांच्या योग्य उपयोगावरच लोकशाहीचे यश अवलंबून आहे. ह्या संविधानामुळे उदारमतवाद्यांना घाबरण्याचे फारसे प्रयोजन नाही. मर्यादित आणि अत्यंत संकुचित अशा भौतिक उद्दिष्टे असतानाही हुकूमशाही जर नियोजनाशिवाय वाटचाल करू शकत नसेल तर मानवी साह्याने मानवी मूल्यांचे संगोपन कर-ण्याची खूणगाठ बांधलेल्या लोकशाहीला नियोजनविना समाजाचे तारू योग्य दिशेला नेणे कसे शक्य आहे ? नाहीतर समाजाचे तारू मुक्त आर्थिक व्यवस्थेच्या भोवऱ्यात सोडल्याचे पातक लोकशाहीला लागेल.

( २ )

## लोकशाही नियोजनातील

## अग्रक्रम द्यावयाची उद्दिष्टे

वरील विवेचनावरून हे स्पष्ट दिसून येईल. की लोकशाही नियोजनाचा पिंड– प्रवृत्तीने, उद्दिष्टानी, अग्रक्रमाबाबत आणि अंमलबजावणीच्या पद्धतीत –हुकूमशाही–नियोजनापेक्षा निःसंशय निराळा आहे. लोकशाही नियोजनात उत्पादनवाढीचे एक साधन म्हणून मानवी घटकांकडे न पाहिले जाता त्यांच्या कर्तृत्वाला ( creativity ) वाव देण्याकडेच जास्त लक्ष दिले जाईल. त्यामुळे सर्वमान्य अशा स्वीकृत उद्दिष्टांच्या प्राप्तीसाठी सामुदायिक सहकारी



अनुक्रमणिका






प्रयत्नांना आपोआपच प्रोत्साहन मिळेल. फुटक्या दमडीची खोटी लालसा दाखवून सातत्याने मनुष्य-घटकाला राबविण्यापेक्षा किमानदृष्टीने का होईना पण त्यानाच अधिक' प्राधान्य मिळविण्याकडे लोकशाही नियोजनाचा प्रयत्न राहील.

वर उल्लेखिलेल्या उद्दिष्टांमुळेच लोकशाही नियोजनातील अग्रक्रमांचा प्रश्न निर्माण होतो. सर्वसाधारणपणे लोकशाही नियोजन आणि हुकूमशाही नियोजन परस्परविरोधी असल्याचे दिसून येते. त्यामुळे लोकशाहीत साहजिकच अन्नधान्य, जीवनावश्यक वस्तू, शिक्षण, आरोग्य, निवारा, कपडे इत्यादी गोष्टींना अग्रक्रम मिळतो. संरक्षणासाठी आवश्यक असलेल्या उत्पादनाव्यतिरिक्त कोणत्याही उत्पादनाला प्राधान्य उरत नाही. सामाजिक सुराज्य निर्माण होण्यासाठी अंगीकारलेल्या नियोजनात जड उद्योगधंदे आणि अवाढव्य व प्रचंड अशा योजना ह्या मतप्रणालीच्या महाभागाना माझे वरील विधान हास्यास्पद वाटेल. पण तात्त्विकदृष्ट्या असा समज अत्यंत चुकीचा आहे. एवढेच नव्हे तर आजवरच्या अनुभवाने वरील समज खोटादेखील ठरविला आहे.

सर्वसाधारण परिस्थितीत समाजाच्या वाढत्या आकांक्षाना मूर्तस्वरूप देण्यासाठी उत्पादन–साधने आणि सामाजिक संस्था अपुऱ्या व असमर्थ ठरतात म्हणूनच समाजाला नियोजनाचा स्वीकार करणे अपरिहार्य ठरते. पुरेसे भांडवल आणि निष्णात मनुष्यशक्ति ह्यांच्या अभावामुळे अज्ञान, अस्वास्थ्य, उपासमार, दारिद्य इत्यादींच्या गरजेतून सर्वसाधारण माणसाला अल्पावधीत सहजी वर काढणे कठिण होऊन बसते आणि म्हणूनच सामाजिक सुस्थितीची जास्तीत जास्त फळे चाखावयास मिळतील अशा रीतीने उपलब्ध भांडवल व मनुष्यशक्ती ह्यांची गुंतवणूक केली पाहिजे. त्यामुळेच मुक्त आर्थिक व्यवस्थेपेक्षा नियोजित आर्थिक व्यवस्थेमुळे माणसांच्या आवश्यक गरजा अधिक चांगल्या रीतीने, अधिक समाधानकारकरीत्या भागविल्या जातात.

पूर्णतः आर्थिक दृष्टिकोनातूनही नियोजनातील वरील अग्रक्रमांचे समर्थन करता येते. प्रो. पी. सी. महालोनोबीस– हुकुमशाही नियोजनाबद्दल त्यांचा दृष्टिकोन पूर्वग्रहदूषित होता हे म्हणणे फार धाष्टर्याचे ठरेल. रशियातील आर्थिक व्यवस्थेत गुंतविलेल्या दर कोटी रुपयांच्या भांडवलामागे उत्पादन ( output ) आणि नोकरीची धारणाशक्ती ( employment potential ) ह्याची तक्तेवारी खालीलप्रमाणे देतातः–

| विभाग ( sector ) | उत्पादन [ लाख रुपये ] | नोकरीची धारणाशक्ती |
|---|---|---|
| शेती | ५७ | ४००० |
| जीवनावश्यक वस्तू | ३३ | ११५० |
| जड उद्योगधंदे | १९ | ५०० |

त्यामुळे अन्नधान्य व जीवनावश्यक वस्तू ह्यांची टंचाई असलेल्या, वाढत्या बेकारीला आळा घालण्यास असमर्थ ठरलेल्या भांडवलाची कमतरता असलेल्या भारतासारख्या देशाने कोणता मार्ग अंगिकारावा हे स्पष्ट होते.

अग्रक्रमांबाबत जो मसुदा येथे मांडला आहे त्यात ' जड उद्योगधंद्याची ' उपेक्षा होत आहे हे समजण्याचे कारण नाही. आमचे म्हणणे एवढेच आहे की दुसऱ्या पंचवार्षिक योजनेपासून जड उद्योगधंद्यांना जे प्राधान्य देण्यात आले आहे त्यापेक्षा लोकांच्या गरजा लक्षात घेऊन त्यांना दुय्यमच स्थान दिले गेले पाहिजे. सद्यः-स्थितीत परदेशी चलन आणि आपल्या अत्यल्प उत्पन्नाचा बराचसा भाग जड उद्योगधंद्याच्या प्रकल्पासाठी खर्च होत असतो. अशा योजनांचा पूर्णावस्था काल बराच मोठा असतो. उलटपक्षी शेती, लहानसहान उद्योगधंदे, ह्यांना जर अग्रक्रम देण्यात आला तर नियोजनावर प्रमाणाबाहेर ताण न पडता जड उद्योगधंद्यांच्या वाढीसाठी आवश्यक अशी पार्श्वभूमी निर्माण करता येईल.

वरील विवेचनानुसार अग्रक्रम ठरविल्यानंतर उत्पादक साधनांची अधिक काळापर्यंत आयात करणे आवश्यक बनते. उत्पादक साधनांची आयात की आर्थिक स्वयंपूर्णता ह्यात कसली निवड करायची हा येथे प्रश्न नाही. खरे पाहता उत्पादनाच्या– शेती, जीवनावश्यक वस्तू , उत्पादक साधने, तांत्रिक ज्ञान आदी क्षेत्रात–







कुठल्या दर्जापर्यंत स्वयंपूर्णतेचा स्वीकार करावा हे आपण आधी ठरविले पाहिजे. नियोजनातील उद्दिष्टांना मूर्तस्वरूप देऊ शकणाऱ्या स्वयंपूर्णतेची सांगड घालणे अधिक शहाणपणाचे होणार आहे. मला येथे नम्रपणे नमूद करावेसे वाटते की ज्या दृष्टिकोनातून आपल्या नियोजनाच्या उद्दिष्टांची सुस्पष्टपणे मांडणी करण्यात आली आहे तोच दृष्टिकोन पुढे न ठेवता नियोजनातील अग्रक्रमांची मांडणी करण्यात आली आहे. त्याचा परिणाम म्हणूनच की काय इतर अनेक दोषांबरोबर मनुष्यघटकांची ( fifth factor of production ) अक्षम्य उपेक्षा झाली आहे. आणि तसे न होऊ देणे हे लोकशाही नियोजनाचे प्रथम कर्तव्य आहे. मला असे म्हणावयाचे आहे की समाजातील सर्व थरातील घटक स्वतःच्या हितसंबंधाबरोबरच, नियोजनाच्या हितसंबंधाचीही जाणीव ठेवतील आणि नियोजनाच्या यशस्वितेसाठी प्रयत्नांची पराकाष्ठा करतील असे आर्थिक, सामाजिक आणि सांस्कृतिक वातावरण निर्माण केले पाहिजे. ह्या मुद्यावर माझा जास्त जोर आहे. कारण वैभवशाली भविष्याची नुसती आश्वासने देऊन लोकांना अल्पकाळापर्यंतच झुलविता येईल हे आपण विसरता कामा नये. त्यांच्या दैनंदिन जीवनात लोकशाही मूल्याचा ( समता, व्यक्तिस्वातंत्र्य इ. ) अनुभव येत राहिला तरच नियोजनाच्या यशासाठी आपली सर्वशक्ती पणाला लावण्यास ते तयार होतील. साम्यवाद्यांनाही अनिच्छेने का होईना पण हे अलीकडे पटायला लागले आहे. ह्या संदर्भात चीनचे उदाहरण मोठे उद्बोधक आहे. जड उद्योगधंद्यांना प्राधान्य देण्यात चूक झाली हे इ. स. १९६२ साली चिनी नेत्यांनी कबूल केले आहे. एवढेच नव्हे तर त्यानंतर शेती, लहान उद्योगधंदे, आणि मग जड उद्योगधंदे असा अग्रक्रम देखील त्यांनी ठरवून टाकला.[१] रशियात देखील लिबरमन ( Libermann ) ह्याच्या प्रस्तावावर जी चर्चा झाली तिचा रोखही असाच होता. शेतीधंद्याच्या हितसंबंधाची जोपासना होण्यासाठीच क्रुश्चोव्हने रासायनिक उद्योगधंद्यांना जास्त प्राधान्य दिले होते. पण साम्यवादी ते साम्यवादीच ! त्यांना त्यांची तत्त्वनिष्ठाच देशाच्या सुदृढ आर्थिक प्रगतीपेक्षा जास्त महत्त्वाची वाटते. जेथे तत्त्वनिष्ठेलाच महत्त्व दिले जाते अशा राजसत्तेच्या कार्यपद्धतीत जोपर्यंत महत्त्वाचे बदल केले जात नाहीत तोपर्यंत साम्यवाद्यांकडून नियोजनात काही सुधारणा होतील हे अपेक्षिणे चुकीचे आहे. त्या दृष्टीने लोकशाहीवाद्यांचे आसन थोडेसे बळकट आहे. कारण ज्या मूल्यांची ते जतन करीत आहेत त्यांचीच नियोजनासाठी आवश्यकता आहे.

लोकशाही नियोजनात अपेक्षेपेक्षा अधिक कालावधीपर्यंत उत्पादन–साधनांची आयात करणे आवश्यक असल्याचे वर नमूद केलेच आहे. ह्याचा अर्थ जड उद्योगधंद्यात आपण स्वयंपरिपूर्ण होऊ नये असा घेतला जाऊ नये. किंबहुना त्यासाठीच अगोदर इतर उद्योगधंद्यांना प्राधान्य दिले पाहिजे असे माझे स्पष्ट मत आहे. नुसत्याच उत्पादनात स्वयंपूर्णता आणण्याचा प्रयत्न करण्यापेक्षा कोणत्याही स्वाभिमानी समाजाने आपल्या गरजा कोणत्या व त्या पूर्ण होण्यासाठी पैशांचा योग्य रीतीनेच विनियोग केला पाहिजे. संरक्षणाच्या बाबतीत देशाने स्वयंपूर्ण असले पाहिजे ह्या विचाराला मात्र मान्यता द्यावी लागेल. आणि अमेरिका वा रशिया ह्या देशांव्यतिरिक्त अन्य कुठलाही देश स्वसंरक्षणासाठी स्वयंपूर्ण आणि समर्थ नाही ह्याचीही आपण दखल घेतली पाहिजे. म्हणूनच भारतासारख्या अप्रगत, विकासशील देशाने संरक्षणाबाबत स्वयंपूर्ण होण्याचा अट्टाहास न करता दोस्त राष्ट्रांची मदत पोचेपर्यंत शत्रूला थोपवून धरण्याइतपत संरक्षण-तयारी ठेवली पाहिजे. आणि दुर्दैवाने आपण ह्याही बाबतीत उणे पडलो आहोत. अर्थात् त्याचा दोष येथे अभिप्रेत असलेल्या सुदृढ नियोजनाकडे न जाता, चुकीचे परराष्ट्रधोरण आणि संरक्षणाच्या बाबतीतली आपली गाफीलता ह्याकडे जातो. विकसित देशाला आवश्यक असलेल्या संरक्षणविमा योजनेकडे ( Mili-

1. " Improve further the work in planning and try to attain a comprehensive balance ........................ in the economy in accordance with the [ declining priority ] order of agriculture, light industry, and heavy industry" – from Chou-En-lai's report to the National Peoples Congress, March 1962. Quoted in China Quarterly, No. 17, p. 11.








tary insurance ) हेतुपुरस्सर काणाडोळा करूनच आपण आपली धोरणे ठरविली होती, आणि त्याचा तो परिपाक होता. सरकारने ह्याची निर्भीडपणे कबुली दिलेली नसली तर सरकारचे पितळ चांगलेच उघडे पडल्यामुळे त्याचे विवेचन येथे अनावश्यक आहे. आपण हे विसरता कामा नये की संरक्षण-विमायोजना म्हणजे इतरांवर अवलंबून राहणे नव्हे. पण ह्या योजनेमुळे संरक्षण सज्जतेच्या साधनांचा अभाव असूनही नजीकच्या काळात कोठल्याही हितसंबंधांचा बळी न देता किमान खर्चात देशाच्या संरक्षणाची परिणामकारक व्यवस्था करणे शक्य होते.

## संभाव्य आक्षेप : त्यांचे निराकरण

वरील विवेचनात ज्या अग्रक्रमांचे मी समर्थन केले आहे त्याबाबत बरेच आक्षेप घेता येतील. त्यातला एक आक्षेप उभा घेता येईल की समर्थित धोरणामुळे सरकारने स्वीकृत केलेल्या धोरणापेक्षा जड उद्योगधंद्यांची वाढ शिथिल होईल आणि त्यामुळे देशाचा आर्थिक ताण आणि बोजा जास्त वाढेल. अंशतः वरील आक्षेपात तथ्य असल्याचे कबूल करून देखील हा आक्षेप सामाजिक सुबत्तेच्या दृष्टिकोनाची फसगत करणारा हे लक्षात घेतले पाहिजे. भांडवलप्रणीत जड उद्योगधंद्यांत ( wage bill ) हे संपूर्ण भांडवलाच्या मानाने अत्यंत कमी असते आणि ह्या कारणामुळे शेती धंदा किंवा लहान उद्योगधंदे ह्यापेक्षा शिलकी साठ्याचा वेग ( rate of surplus accumulation ) हा जड उद्योगधंद्यात अधिक असतो असे म्हटले जाते. पण पुढील दोन युक्तिवादामुळे तरी हे विधान फसवे आहे असे म्हणणे भाग आहे. त्यातला पहिला युक्तिवाद असा करता येईल की भारतासारख्या देशात जास्त भांडवलाच्या कोणत्याही योजनेचा पूर्णावस्थाकाल हा कमीतकमी आठ वर्षांचा घेता येईल. ( आणि अनेक कारणामुळे नजिकच्या भविष्यकाळात ह्यात फरक होईल असे म्हणता येणार नाही. ) आणि अशा प्रकारची योजना पूर्ण झाल्यावर जेव्हा उत्पादनाला सुरवात होते तेव्हा गुंतविलेल्या भांडवलाच्या परतफेडीचा दर सुमारे शे. चार ते सहाच्या[2] दरम्यान असतो असे मानू या, आणि तरीही आठ वर्षांच्या प्रतीक्षेनंतर उत्पादनाची किंमत गुंतविलेल्या भांडवलाच्या सुमारे शे. १४ टक्के होईल. म्हणजे अशा प्रकारची योजना सुरवातीनंतर जवळ जवळ पंधरा वर्षांपर्यंत कोणत्याही रूपाने राष्ट्रसंपत्तीत प्रत्यक्ष भर टाकू शकणार नाही. आणि कर्ज काढण्याचे प्रमाण ( debt amontization rate ) मात्र भरमसाठ वाढत राहील. आणि त्यामुळे कर्जाचा बोजा सर्वसाधारण माणसावर अधिकाधिक पडेल.[3] सर्वस्वी परदेशी मदतीवर अवलंबून असणाऱ्या, आणि तुटीची आर्थिक परिस्थिती असलेल्या देशात औद्योगिकरणाच्या प्राथमिक अवस्थेत उत्पादक सामुग्रीची आयात करणेच जास्त फायद्याचे होईल. लोकांच्या आवश्यक गरजांचा बळी देऊन उत्पादक सामुग्री देशातच निर्माण करण्याचा खटाटोप अशा अवस्थेत न करणेच ठीक. अशा अवस्थेत म्हणूनच शेती, लहान उद्योगधंदे, ह्यानाच प्राधान्य दिले जावे. त्यामुळे कामगारांच्या रोजगारात आणि पर्यायाने कार्यक्षमतेत वाढ होईल. लोकांची बचतशक्ती (saving power) वाढेल. आणि पुढच्या टप्प्यात मग जड उद्योगधंद्यांना प्राधान्य देणे सोयीचे आणि सोपे होईल. आर्थिक व्यवस्थेवर जास्त ताण न पडू देता उपलब्ध आर्थिक व्यवस्थेने भांडवल संचय सहजगत्या करता येईल. एवढेच नव्हे तर जड उद्योगधंद्यांच्या वाढीसाठी आवश्यक असलेल्या आर्थिक परिस्थितीचा पायाही आपोआप भक्कम होईल.

वरील दृष्टिकोनातून दुसऱ्या आणि तिसऱ्या पंचवार्षिक योजनांकडे पाहिले तर ह्या योजनांचा संसार किती विसंगत आणि ठिसूळ पायावर उभा आहे ह्याची कल्पना येते. एका बाजूला सामाजिक सुबत्तेसाठी नियोजन आहे असे म्हणायचे आणि लगेच दुसरीकडे तेरा वर्षांच्या नियोजनानंतरही सामान्य माणसाला सांगायचे की, " बाबारे, अजून दहा, पंधरा वर्षे थांब; मग तुला नक्कीच तुझ्या बलिदानाची

२. केन्द्रसरकारच्या नियंत्रणाखालील निरनिराळ्या ६१ प्रकल्पांमध्ये आता पर्यन्त परतफेडीचा दर गुंतविलेल्या भांडवलाच्या शे. ३ पेक्षाही कमी आहे.

३. १९६०–६१ साली ५० कोटी रु. आणि १९६४–६५ साली १४० कोटी रुपये.









फळे चाखावयास मिळतील." हे सर्व संतापजनक आहे. आणि ह्यामुळे लोकशाहीच्या उच्चाटनाला हात-भार लावण्याचेच काम होते आहे. जड उद्योगधंद्यांना प्राधान्य देणाऱ्या नियोजनाचा स्वीकार करून आणि ज्या मार्गांनी ते यशस्वी होईल त्या मार्गांचा अव-लंब न करता आर्थिक सुबत्ता निर्माण करणे अशक्य-प्राय आहे. म्हणून नियोजनाचे स्वरूप तरी बदलले पाहिजे किंवा नियोजन अंमलात आणण्याच्या पद्धतीत बदल केला पाहिजे; नाहीतर totalalitarian पद्धतीच्या पाठीराख्यांचे सामर्थ्यवाढीस आपण जबाबदार ठरू. मग ह्या पाठीराख्यांना साम्यवादाबद्दल प्रेम नसेनाका. नियोजनाच्या विचारापुरते तरी औद्यो-गिक उत्पादनाचे पुरस्कर्ते, बरेच अर्थशास्त्रज्ञ, राज्य-शास्त्रविशारद, आणि कट्टर समाजवादी ह्यांना कम्युनिस्ट वा त्यांचे सहप्रवासी ह्यांच्यापासून वेगळे करणे दूर जाईल.

( ३ )

## लोकशाही व हुकूमशाही यांमधल्या नियोजनातील भिन्नता

वरील सर्व विचार केल्यानंतर लोकशाही नियोजन आणि हुकूमशाही-नियोजन ह्यातील तिसऱ्या भिन्नते-कडे आपण वळू. हुकूमशाही नियोजनाची उद्दिष्टे मुख्यत्वे आर्थिकच असतात किंवा फार तर सामुदायिक असतात हे स्पष्ट झालेच आहे. त्यामुळेच एक साधन म्हणूनच ते मानवाला आपल्या चौकटीत बसविण्याचा प्रयत्न करतात. मनुष्यघटकांच्या स्वास्थ्याची, त्यांच्या परिश्रमाची त्यांना क्षिती नसते. मनुष्यघटक स्वेच्छेने आणि आपुलकीने श्रम करण्यास तयार होतील अशा सुखसोयी उपलब्ध करण्याची आवश्यकता त्यांना भासत नाही. मानवाला त्याच्या अमाप श्रमाचे हेच फळ मिळते. हुकूमशाही नियोजनाचे लागूलचालन करणाऱ्यांना "आमच्या देशात इतके इतके लाख टन पोलाद तयार होते, एवढी धरणे बांधण्यात येत आहेत, इतकी विद्युत् गृहे तयार झाली आहेत" ह्यांचेच श्रमिकांच्या सुख-सोयीपेक्षा जास्त महत्व वाटते. जर नियोजनामुळे 'आपहि आप' सर्वसाधारण मनुष्याचे जीवन जास्त सुसह्य होत असेल तर ठीकच पण हे मात्र त्यांचे दुय्यम उद्दिष्ट असते. त्यांचे मुख्य उद्दिष्ट हे हमखास "अमानुष" (non-human) असते. अर्थात् हुकूमशाही नियो-जनाचा कोणताच पुरस्कर्ता असे म्हणणार नाही. तसे झाले तर तो अदूरदर्शीपणा होईल (त्यांच्या दृष्टीने)! परंतु वर काढलेल्या निष्कर्षांना हुकूमशाही नियोजनाची डोळसपणे छाननी केली तर दुजोराच मिळतो. नाहीतर स्टालिनच्या सामुदायिक कार्यक्रमात ज्या लाखो शेत-कऱ्यांच्या जिवाचे हाल झाले त्याचे उत्तर आपल्याला मिळणार नाही; तद्वतच चीनमधील (Chinese comunes) वंशपरंपरागत चालत आलेल्या कुटुंब-पद्धतीचा पाशवी मार्गांनी केलेला ब्रीमोड ह्याचेही गुह्य आपल्याला उकलता येणार नाही. बऱ्याच साम्यवादी देशामध्ये **आर्थिक व्यवस्थेचा आवश्यक भाग** म्हणून जे Labour camps बनविले गेले त्याचे मूळही वर काढलेल्या निष्कर्षातच आहे.

लोकशाही नियोजनात ह्याच्या नेमके विरुद्ध सर्व-साधारण मनुष्याचे व्यक्तिमत्त्व समृद्ध व्हावे आणि त्याच्या वाढीस उत्तेजन मिळावे म्हणून आर्थिक उद्दिष्टांची यथार्थ आखणी केलेली असते. त्या कारणा-स्तव त्याचा सर्वस्वी जोर योजनेच्या स्पष्ट प्रतिपादना-वर आणि लोकांचे मन वळविण्यावर ,असतो. ही प्रक्रिया जरी महाप्रयासाची आणि संथ असली तरी हरकत नाही. पण जुलूम, जबरदस्ती ह्यांचा अवलंब मात्र कोणत्याही परिस्थितीत करण्यात येणार नाही. सरकारी फर्मानाने त्यामुळे जनतेला एकत्र करण्यापेक्षा लोकच स्वयंप्रेरणेने एकत्र येतील सहकारी जीवनाला उत्तेजन मिळाल्यामुळे बऱ्याच संस्था आणि व्यक्ती आपल्या सहकारी प्रयत्नांनी ज्या मूल्यांची उराशी त्यांनी जपणूक केली त्या मूल्यांच्या प्रस्थापनेचा प्रयत्न करतील. त्यामुळे औद्योगिक उत्क्रांतीचा ताण आर्थिक प्रगतीवर पडणार नाही. तद्वतच आर्थिक प्रगतीची अवहेलनाही होणार नाही. ह्यासाठी वरील संस्थांचा नक्कीच उपयोग करता येईल.

अत्यंत अपरिहार्य परिस्थितीतच फक्त शासन उत्पादकाचे कार्य आपल्या हाती घेईल. उदाहरणार्थ, जेव्हा भांडवल अपुरे पडेल, भांडवलाचा ओघही कमी होईल वा देशाची सुरक्षितता धोक्यात आलेली असेल, फक्त अशा वेळेसच शासनाची भूमिका उत्पादकाची होईल. एरव्ही मात्र शासनाची भूमिका आर्थिक










अनुक्रमणिका

व्यवस्थेच्या नाड्या हातात ठेवणाऱ्याची असेल. त्यामुळे साहजिकच आर्थिक-शक्ती केंद्रित न होऊ देता, ठरविलेल्या किमतींचे ( Price line ) उल्लंघन होणार नाही, निरनिराळ्या विभागांमध्ये ( Sectors ) विषमता निर्माण होणार नाही, नियंत्रित व संघटित भांडवलदारांकडून वा संघटित कामगारांकडून असंघटित अशा कोणत्याही थराची गळचेपी होणार नाही ही सर्व जबाबदारी नियोजनाची असेल.

## पब्लिक सेक्टरला मर्यादितच वाव द्यावा

आमच्या ह्या मतप्रणालीला मोठ्या प्रमाणावर राष्ट्रीयीकरण मान्य नाही. खाजगी उद्योगधंद्यांनाही योग्य स्थान दिले पाहिजे असे आमचे स्पष्ट मत आहे. दोन महत्त्वाच्या कारणामुळे व्यापार आणि उद्योगधंदे ह्यात विशिष्ट पातळीपर्यंतच 'पब्लिक सेक्टरच्या' विकासास वाव देण्यात यावा. त्यापैकी पहिले कारण असे सांगता येईल की खाजगी उद्योगधंद्यांपेक्षा पब्लिक सेक्टरची कार्यक्षमता फार कमी असते. काही अपवाद वगळल्यास आतापर्यंतच्या आपल्या अनुभवावरून ह्या विधानाची सत्यता पटते. आणि हा कार्यक्षमतेचा अभाव हा व्यापार आणि उद्योगधंदे ह्यापुरताच मर्यादित नाही तर शासन, शिक्षण, संशोधनसंस्था, आदी महत्त्वाच्या क्षेत्रातही तो प्रामुख्याने दिसून येतो. ह्या सार्वजनिक अनुभवाची कारणमीमांसा करू केल्यास मनुष्यस्वभावातच त्याचे मर्म असल्याचे दिसून येईल. राष्ट्रसंघर्षाचा समय सोडल्यास समाजाच्या ऋणाची आत्यंतिक जबाबदारी ही सर्वसाधारण माणसाला प्रेरक ठरूच शकत नाही किंवा दुसऱ्या शब्दात असे म्हणता येईल की सर्वसाधारण मनुष्य हा सामाजिक कर्तव्याबाबत उदासीन असतो. विशेषतः अप्रगत विकासशील देशात ह्याची प्रचीती फार येते. आणि त्याचे कारण असे देता येईल की जलद आर्थिक प्रगतीचा कारण असे देता येईल की जलद आणि सर्वसाधारण माणसाच्या सामाजिक भावनेशी व त्याच्या वागणुकीच्या चौकटीशी सुसंवाद घातला जात नाही. व्यक्तिगत आर्थिक प्राप्तीच्या प्रेरकशक्तीच्या अभावामुळे ही उणीव जास्तच तीव्रतर होते. अलीकडेच प्रसिद्ध झालेल्या आकडेवारीवरून 'पब्लिक सेक्टर' सर्वस्वी तुटीच्या ( loss ) व्यवहारावर चालतो वा अडकविलेल्या भांडवलावर फारच अल्पप्रमाणात परतफेड करतो हे स्पष्टपणे दिसून येते. अर्थात् हे निराशाजनक असले तरी आश्चर्यकारक समजण्याचे कारण नाही.

पब्लिक सेक्टरला मर्यादितच वाव द्यावा ह्याची कारणमीमांसा करीत असता शासनाच्या हातात सत्तेचे केंद्रीकरण ( Monopoly ) होऊ न देणे आणखी एक महत्त्वाचे कारण पुढे करता येईल. खाजगी उद्योगधंद्यांची मक्तेदारी वाईट खरीच पण शासनाची मक्तेदारी त्यापेक्षाही अत्यंत हानीकारक ठरते. खाजगी उद्योगधंद्यांच्या मक्तेदारीविरुद्ध, जुलमाविरुद्ध जागरुक लोकमत निदान आवाज उठवू शकते आणि अधिकारारूढ शासन प्रामाणिक असेल तर त्याविरुद्ध नक्कीच कडक उपाययोजना केली जाईल. पण शासकीय मिरासदारीविरुद्ध, अरेरावीविरुद्ध मात्र लोकांना जुलूम साहण्याव्यतिरिक्त दुसरा मार्ग राहात नाही. फारतर पुढे मागे शासन त्याना उलथून पाडता येईल. पण हे महाकठीण कर्म आहे. कारण सरकारी झोटिंगशाहीच्या हातातच अमाप आर्थिक सत्तेबरोबर कायदाही असतो. त्यामुळे कमाल मर्यादेपर्यंत शिक्षा करण्याची मुभा त्यांना मिळते, सरकारी नोकरांवर मानेल त्या अटी ते लादू शकते आणि त्यामुळे जीवनातील कोठल्याही क्षेत्रात सरकारने चालविलेल्या अनागोंदी कारभाराविरुद्ध, जुलूमजबरदस्तीविरुद्ध, बुद्धिवाद्यांना देखील टीका करणे कठीण होते. बुद्धिवाद्यांना वा विरोधकांना लोकमानस जागृत करण्याची– सरकारी कायद्यांचा बडगा दाखवून-बंदी करू शकते. त्यामुळे शासकीय महाविद्यालयातील प्राध्यापकाला सरकारच्या दारूबंदी–धोरणावर टीका करता येत नाही. 'हिंदुस्थान ॲन्टिबॉयटिक्स्' आणि 'फिशरीन् डिपार्टमेन्ट' भरमसाट नफा मिळवीत असता त्यांच्या नफेबाजीवर त्याना काही बोलता येत नाही. 'हिंदुस्थान स्टील कं.'च्या अधिकाऱ्यांसाठी 'अशोक हॉटेल' मध्ये खास प्रशस्त व सुसज्ज फ्लॅट ठेवण्यात आला आणि त्यांच्या तैनातीला खास विमान देण्यात आले तरी बिचाऱ्याला त्यावर टीका करण्याची मोकळीक नाही. वर्तमानपत्रांनी ह्याविरुद्ध आवाज उठवावा म्हटले तर त्यांच्या तोंडावर 'कंपनीच्या जाहिराती' फेकून त्यांचेही तोंड बंद केले जाते. १९६३ साली 'लाईफ इन्शुरस










अनुक्रमणिका

कार्पोरेशन ' विरुद्ध दाद मागण्यासाठी ' इन्स्टिट्यूट ऑफ अॅक्च्युरीज' मधील एका सद्गृहस्थाना मुंबईतल्या बहुतेक संपादकांकडे ' निष्फळ ' खेटे घालावे लागले ह्याचे ह्या संदर्भात स्मरण झाल्याशिवाय राहात नाही. 'काश्मीरचा प्रश्न ' वा ' आपले परराष्ट्रीय धोरण ' ह्यासारखे महत्त्वाचे हे प्रकरण होते असेही नाही. आणि तरीही ह्या अपक्ष, जबाबदार आणि तज्ञ माणसाचे पत्र कोणत्याही वर्तमानपत्रात प्रसिद्ध केले गेले नाही. [ हे गृहस्थ L. I. C. च्या स्थापनेपूर्वी बऱ्याच विमाकंपन्यांचे सल्लागार म्हणून काम करीत होते ] आणि एवढ्यावरच हे थाबत नाही. सरकारी नोकरीतील बुद्धिवाद्यांची किंवा सरकार-आश्रित वर्तमानपत्रांचीच अशी स्थिती होते असे नव्हे तर विरोधीपक्ष आणि जनता ह्यानाही नाउमेद करण्याचे काम ' पब्लिक सेक्टर'च्या मदतीने सहज करता येते. त्यामुळे सरकारी धोरणावर निर्भीड टीका करण्याइतकेच वातावरण निर्माण होत नाही. आणि परिणामी ' पब्लिक सेक्टर'च्या बेसुमार वाढीमुळे लोकशाहीच्या मुख्य गाभ्यालाच धक्का बसतो.

### संमिश्र आर्थिक व्यवस्था योग्य ठरेल

लोकशाही नियोजनाच्या यशस्वितेसाठी मग कुठल्या आर्थिक व्यवस्थेचा स्वीकार केला पाहिजे हा प्रश्न आता निर्माण होतो. अमर्यादित, अनियंत्रित खाजगी उद्योगधंदे हा त्यावरील नक्कीच उपाय होऊ शकत नाही. कारण कोणत्याही अप्रगत, विकासशील देशात खाजगी उद्योगधंदे फायद्याचे, प्रामाणिक आणि सुसंपन्न समाज करण्याइतके दूरदर्शी नसतात. त्यामुळे आर्थिक व्यवस्थेचे आधुनिकीकरणाचे कार्य अनियंत्रित खाजगी उद्योगधंद्यावर सोपवून चालणार नाही. लोकशाही नियोजनाच्या उद्दिष्टांच्या फलप्राप्तीसाठी खाजगी उद्योगधंद्यांना शिस्त लावली पाहिजे. त्यासाठी कायद्यात आवश्यक ती तरतूदही करावी. काही पिढ्यांपासून जनतेची प्रामाणिकपणे अविरत जनतेची सेवा करणाऱ्या काही कंपन्यांपासून तर संतापजनक फायदा उठविणाऱ्या साखर कारखानदारापर्यंत निरनिराळ्या प्रकारचे लोक खाजगी उद्योगधंद्याचा फायदा उठवीत असतात हे आपण लक्षात घेतले पाहिजे. सर्वच खाजगी उद्योगधंदे भांडवलशाही-प्रवृत्तीचे असतात असेही नाही. लहान सहान व्यापारी, शेतकरी आणि काही उत्पादक ( manufacturers ) कंपन्या आपापल्या परीने आपल्या नोकरांच्या साह्याने उत्पादनात भर टाकीत असतात. उत्पादनाच्या कार्याला हातभार लावणाऱ्या सहकारी संस्थाही आता अस्तित्वात आल्या आहेत. वर उल्लेखिलेले घटक व्यक्तिगत स्वार्थाने प्रेरित होऊन जरी काम करीत असले तरी लोकशाहीला आव्हान देण्याची वा समाजाचे खंडण करण्याची त्यांच्यात ताकद नसते. त्या उलट प्रादेशिक हितसंबंधानी प्रेरित होऊन सरकारी कर्जे, वहातक अशा विविध क्षेत्रात ज्यांची अमर्याद सत्ता चालते त्या अतिलोभी समाज-घटकांविरुद्ध वरील घटकांना स्वतःच्या कायदेशीर हितसंबंधाचे देखील संरक्षण करता येत नाही, म्हणूनच ' खाजगी उद्योगधंद्यांना शिस्त लावली पाहिजे' असे जे म्हटले जाते त्याच्या अमलबजावणीसाठी कोणतीच पद्धत सुलभ, सर्वमान्य आणि शिस्त लावण्यास पुरेशी ठरणार नाही.

पण शिस्त लावणे म्हणजे काही सर्वनाश नव्हे. साधनशुचितेची जर खाजगी उद्योगधंद्यांनी चाड राखली तर राष्ट्रउभारणीसाठी त्यांची वाढ होणे आवश्यक आहे असे आम्हाला वाटते. किंबहुना उपलब्ध असलेल्या कोणत्याही पद्धतीपेक्षा वा हुकूमशाही भांडवलदारीपेक्षा निर्बंधित खाजगी उद्योगधंदेच लोकशाही आणि स्वातंत्र्य ह्यांना जास्त प्रेरणाभूत ठरत असतात. गेल्या शंभर वर्षांचा बोलका अनुभव असे स्पष्ट सांगतो की शासनाचे आर्थिक व्यवहारात अवैध हितसंबंध गुंतलेले नसतील तर सर्वसामान्य माणसाच्या हितसंबंधांचे रक्षण करण्यासाठी शासन अमर्यादपणे सत्तेचा वापर करू शकते. पण जर आर्थिक तशीच राजकीय सत्ता शासनाच्या हातात एकवटली तर ' पब्लिक सेक्टरची ' प्रमाणाबाहेर वाढ होऊन व्यक्तिस्वातंत्र्याला दुःसाध्य असा धोका निर्माण होतो. एवढेच नव्हे तर समता, सामाजिक न्याय ह्यांच्या मूल्यांचे देखील उच्चाटन होण्याची वेळ येते. व नवीनच असा अधिकारारूढ वर्ग निर्माण होऊन त्यांना त्याचा फायदा मिळतो[४].

४. उदाहरणार्थ— रशियातील पोलादधंद्यांतील ' wage differentials ' ब्रिटन किंवा अमेरिकेतील पोलादधंद्यांपेक्षा फार विस्तृत आहे.






म्हणूनच लोकशाहीसाठी नियोजन कोणते ह्या पेचाचे उत्तर खालीलप्रमाणे देता येईल. मोठ्या प्रमाणात उद्योगधंद्यांचे राष्ट्रीयीकरण किंवा अनिर्बंधित खाजगी उद्योगधंदे ह्यांच्याशी लोकशाही नियोजन सुसंवाद राखू शकत नसल्यामुळे कोणत्या प्रकारे आर्थिक व्यवस्थेची जोखड शासनाने उचलावी हा प्रश्न येथे निर्माण होतो. आणि संमिश्र आर्थिक व्यवस्थेचा ( mixed economy ) स्वीकार करणे हेच त्याचे योग्य उत्तर होय. अशा प्रकारच्या आर्थिक व्यवस्थेत बऱ्याच प्रकारच्या Organisational types चा समावेश होतो. आपल्या सामाजिक गरजा कोणत्या, त्यांची कर्तृत्वशक्ती काय ह्या सर्व दृष्टिकोनातून प्रत्येक विभागाची मधून मधून छाननी करण्यात यावी आणि सर्व विभागावर बंधने असावीत.

पब्लिक आणि प्रायव्हेट सेक्टर्स– मग ते सहकारी असोत वा स्वतंत्र– ह्यांची सापेक्ष शक्ती बऱ्याच घटकावर अवलंबून असते. ह्यात आवश्यक भांडवल, तांत्रिक ज्ञान, औद्योगिक शासन–क्षमता, देशाचे संरक्षण व सुरक्षा ह्यांच्याशी निगडित उद्योगधंदे, वा लोकहित सेवा ( Public services) इत्यादी घटकांचा प्रामुख्याने समावेश करता येईल. आर्थिक प्रगती आणि सांस्कृतिक विकासाच्या निरनिराळ्या पातळीवर हे सर्वच घटक जास्त कमी महत्त्वाचे असतात. म्हणूनच पब्लिक सेक्टरमध्ये ज्या उद्योगधंद्यांचा आज समावेश केला जाईल त्यांची काही कालावधीनंतर ( आवश्यक वाटल्यास ) दुसऱ्या विभागात रवानगी करणे फायद्याचेही ठरेल. त्यामुळे शासनाला स्वतःच्या अस्तित्वासाठी आर्थिक सत्तेचा मनाला वाटेल तसा उपयोग करता येणार नाही. तद्वतच खाजगी उद्योगधंद्यांभोवती आज जे रहस्यतेचे कवच आहे त्याची काहीच गरज नाही. खाजगी उद्योगधंद्याच्या संचालक–मंडळावर सरकारला का प्रतिनिधित्व दिले जाऊ नये हे मला समजूच शकत नाही. संचालक मंडळावर जर सरकारचा प्रतिनिधी असला तर त्यामुळे त्यांच्या अधिकारावर गदा येते असे समजण्याचे काही कारण नाही. वा औपचारिकतेच्या चाकोरीचा स्वीकार करावा लागून दफ्तरदिरंगाई होईल असेही मानण्याचे कारण नाही. पण त्यामुळे खाजगी उद्योगधंद्यांना लोकांची फसवणूक आणि लुबाडणूक नक्कीच करता येणार नाही. त्याचप्रमाणे पब्लिक सेक्टरमधील उद्योगधंदे संमिश्र अंगीकृत ( Mixed undertakings ) असे असावेत आणि त्याचे सर्व अधिकार स्वयंशासित ( autonomous ) अशा मंडळाला (Quasi–judicial body) दिले जावेत. ह्या मंडळावर तज्ञमंडळी आणि लोकप्रतिनिधी ह्यांची नेमणूक करण्यात यावी. जलद आर्थिक-प्रगतीच्या गरजा भागविण्यासाठी तद्वतच लोकशाहीच्या वाढीस आवश्यक असलेल्या मतप्रणालीचे सामर्थ्य वाढविण्यासाठी औद्योगिक कार्यकारी मंडळाची काम करण्याची पद्धत कोणती असावी ह्याचा सर्व दृष्टिकोनातून विचार करण्याचे अजून राहिलेच आहे. ह्या प्रश्नावर जो तात्कालिन विचारविनिमय चालू आहे त्यात ' लोकशाही आणि जलद आर्थिक प्रगती ह्यांचा सुसंवाद राहूच शकत नाही ' असा एक मोठा सूर ऐकू येतो. अर्थात् हे बिनबुडाचे आणि प्रमाणित–असिद्ध आहे. त्यावर वादंग माजविणाऱ्यांपैकी कोणीही आपली किमान बौद्धिक पातळी सोडून दुसऱ्या बाजूंचा विचार करण्यास तयार होत नाही. लोकशाही-समाजवाद हा परस्पर-विसंगत ( self-contradictory ) असा टाहो ते फोडीत असतात. माझ्या मते हे आपल्या मानसिक आणि बौद्धिक कमकुवतपणाचे लक्षण आहे. आणि हा कमकुवतपणाच पंचवार्षिक योजनांची ध्येयधोरणे, योजनेतील अग्रक्रम आणि त्यांच्या अंमलबजावण्याच्या पद्धती ह्यात संतापजनक विसंगती निर्माण करण्यास कारणीभूत झाला आहे. अशा विचारसरणीचे महाभाग त्यांना योग्य वाटणाऱ्या पण असिद्ध प्रमेयांच्या आधारे बडबडत सुटतात. त्यामुळे लोकशाही नियोजनाशी निगडीत असलेल्या सांस्कृतिक आणि शैक्षणिक बाबींचा सखोल विचार करण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे.

४

## नियोजनातील कार्यक्रमांच्या अंमलबजावणीचा विचार

त्याशिवाय नियोजनाच्या कार्यक्रमांची अंमलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांना योग्य शिक्षणाची अजूनही सोय केली गेली नाही ह्या निष्काळजीपणाचे समर्थन करणे कठीण होईल. नियोजनाच्या कार्यक्रमांचे








यश सर्वस्वी संबंधित अधिकाऱ्यांच्या परिश्रमांवर, त्यांच्या चातुर्यावर आणि त्यांनी लोकांना किती विश्वासात घेतले ह्यावर अवलंबून आहे. लोकांचा सक्रिय पाठिंबा असल्याशिवाय ह्या महत्त्वाच्या योजना कशा यशस्वी होतील ? आणि ह्या साध्या पण महत्त्वाच्या बाबीची किती दुर्दशा होते ह्याची कल्पना जिल्हा पातळीवर भरविलेल्या थोड्या शैक्षणिक वर्गांच्या अहवालावरून येते. कोणत्या समाजव्यवस्थेकडे आपण वाटचाल करीत आहोत ह्याची जाणीवच त्या अधिकाऱ्यांना नसते. कोणता सांस्कृतिक ठेवा जपण्याचे कार्य करावयाचे आहे ह्याचा त्याना विसर पडतो. ज्या ध्येयांकडे समाजाला तो नेऊ शकतो त्या ध्येयांनी तो स्वतः मात्र भारला जात नाही. एवढेच नव्हे तर त्या ध्येयाबद्दल त्याला फारशी आस्थाही नसते आणि काही वेळेला तर माहिती देखील नसते. ज्या सामाजिक परिस्थितीत आणि जे समाजपरिवर्तनाचे कार्य त्याला करावयाचे आहे ह्याविषयी जर त्याला योग्य आणि परिपूर्ण कल्पना दिली गेली नाही तर तो कार्यक्षमतेने हे महाकार्य तरी कसे करणार ? म्हणूनच अशा अधिकाऱ्यांना त्यांच्या नेमणुकीपूर्वी ह्यासंबंधीचे खास शिक्षण दिले जाणे अत्यंत आवश्यक आहे. पण आमचा समजच मुळी असा आहे की आमचा अधिकारी वर्ग ' अभिमन्यू ' सारखे जन्मतःच तज्ञ आणि शूर आहेत. त्यामुळे डोके खाणाऱ्या व बिकट अशा मनुष्य–यंत्राकडून सहजी व लीलया काम करवून घेऊ शकतील असा कदाचित् त्याना विश्वास वाटत असेल. आणि अभिमन्यूचाच शेवट त्यांच्या नशिबी आला तर त्यात चकित होण्याचे कारण नाही. दुर्दैव एवढेच की अभिमन्यूच्या शेवटाची भव्यता मात्र त्याना प्राप्त होत नाही की दुसऱ्याने टाकलेल्या फसव्या चक्रव्यूहात अडकूनच आपला पराभव झाला असेही समाधान मिळत नाही. आर्थिक प्रगतीसाठी ह्या ( बिन आर्थिक ) घटकांकडे किती बेदरकारपणे, निष्काळजीपणे पाहिले जाते ह्याचे तूर्त हे एकच उदाहरण मी देतो. ह्या घटकांच्या स्वभाव–वैचित्र्याच्या अगदीच भिन्नभिन्न पातळ्या असतात हे मान्य केले पाहिजे. समाजात व्यक्ति–जीवन तसेच असते. किंबहुना परंपराप्रिय अशा आपल्या समाजाचे तसेच घटक म्हणूनच त्याच्याकडे पाहिले पाहिजे. ह्या कारणामुळेच वशिलेबाजी आणि लाचलुचपत भारतीय समाजात सर्वमान्य झाली आहे. म्हणूनच कोणताही भारतीय आपल्या शेजाऱ्या-पाजाऱ्याच्या पलीकडे वा नातलगांच्या पलीकडे पाहण्यास तयार नसतो. सार्वजनिक कार्याबद्दल म्हणून त्याला जास्त काळापर्यंत आपुलकी वाटत नाही; त्याला स्वतंत्रपणे विचार करण्याची संवय नाही; सत्तेपुढे मान तुकविण्यात त्याला अभिमान वाटतो; एवढेच नव्हेतर सत्तेची अपरिमित सेवा करण्याचीही त्याला चटक आहे. जे निर्बल आहेत, उपेक्षित आहेत त्यांच्यावर जुलूम–जबरदस्ती करायला त्याला आनंद वाटतो. पीडितांबद्दल त्याला कीव वाटत नाही. स्वतःची फसवणूक [ आपण फसलोच नाही ह्या समाधानाने ] आयुष्यभर तो करीत असतो. त्याला प्रामाणिकपणे काम करण्याची संवय नाही. दुटप्पी वर्तणुकीचा ठेवा तर परंपरेनेच त्यांच्याकडे आला आहे. स्वतःच्या भाषेची प्रत्येकाला प्रचंड 'मोहिनी' असते. सोयीची गोष्ट वस्तुस्थितीच्या अनुमानांवर पडताळून पहाण्यास तो नाखूष असतो ...... ही सर्व भारतीय परंपरेची वैशिष्ट्ये आहेत. आणि म्हणूनच भारतीय परंपरा हीच लोकशाही नियोजनाच्या मार्गातील एक मोठी अडगळ झाली आहे. त्यामुळे दुसऱ्या महायुद्धापूर्वीच्या जर्मनीत, जपानमध्ये, रशियात वा इतर साम्यवादी देशांमध्ये जे काही घडले त्या ज्वलंत उदाहरणांनीदेखील स्वातंत्र्य आणि समता ह्यांच्या पायावर उभ्या असलेल्या समाजातच औद्योगिक प्रगती सहजरीत्या होत असते ह्याची कल्पना त्याला येत नाही. म्हणून मागासलेल्या अप्रगत संस्कृतीच्या ह्या अडथळ्याकडे आपण अगोदर लक्ष दिले पाहिजे. अप्रगत संस्कृतीचा धोका अप्रगत आर्थिकव्यवस्थेएवढा गंभीर जरी नसला तरीदेखील आपल्या आर्थिक प्रश्नांबरोबरच समाज प्रगतीशीर, सुसंस्कृत आणि पारंपरिक वैगुण्ये नाहीशी करण्याकडे आपण जास्त लक्ष दिले पाहिजे. ह्यासाठी सारा समाज वरून-खालून घुसळून निघाला पाहिजे हे प्रमेय लक्षात घेऊनच ह्या मार्गाची वाटचाल आपण केली पाहिजे. तद्वत्च आर्थिक प्रगतीचे खास शिक्षण देण्याची सोय असावी. येथे असे खेदाने म्हणावे लागते की भारतीय नियोजनात शिक्षणाला अत्यंत खालचा क्रम देण्यात आला आहे; त्यासाठी पैसा उपलब्ध केला जात



अनुक्रमणिका






नाही; गुणी माणसांची त्या क्षेत्रात अक्षम्य कमतरता आहे, आणि भारतीय नियोजनात ही सर्वात मोठी उणीव आहे. शेतीव्यवसायाप्रमाणेच शिक्षणाची ह्या पंचवार्षिक योजनांमध्ये होळी करण्यात आली आहे. ह्याच्या समर्थनार्थ आकडेवारी देण्याची तर आता गरजसुद्धा नाही. स्वर्गीयवासी पंडितजींना यांच्या कारकीर्दीच्या शेवटी शेवटी ह्याची जाणीव होत होती असे वाटू लागले होते. यांच्या वारसदारानेदेखील ह्या सर्व उणीवा ओळखल्या आहेत. निदान शेती, जीवनावश्यक वस्तू, जनसेवा ( Services ) ह्या संबंधीच्या उणीवा त्यांनी नक्कीच ओळखल्या आहेत. नियोजनांच्या कर्त्या करवित्यांपेक्षा त्यांचा दृष्टिकोन निराळा आहे. तरीदेखील लोकशाही नियोजनाच्या कार्यक्रमाला नवीन दिशा दाखविण्यास ते समर्थ होतील की नाही हे अजून पहावयाचे आहे.

---










श्री. अद्वयानंद गळतगे

# अण्वस्त्रांचा प्रश्न

## भारत आणि अणुबॉंब

चीनच्या अणुबॉंबच्या स्फोटाचे प्रतिध्वनी भारतामध्ये व भारताबाहेर बरेच ऐकावयास मिळाले. चीनच्या बॉंबला उत्तर म्हणून भारतानेही बॉंब तयार करावा काय हा प्रश्न भारतीय विचारवंतापुढे या निमित्ताने निर्माण झाला. भारतावरील चीनच्या आक्रमणामुळे भारतीयांना हा प्रश्न विशेष जिव्हाळ्याचा वाटावा हे स्वाभाविक आहे. आणि म्हणून येथे या प्रश्नाची चर्चा निरनिराळ्या पातळीवरून आस्थेने करण्यात आली. चीनला एक-दोन बॉंबमुळे लष्करी क्षेत्रात वर्चस्व मिळणार नसल्याने अणुबॉंब तयार करण्यामागे चीनचा आक्रमणाचा उद्देश असणे शक्य नाही; आणि म्हणून भारताने चीनच्या बॉंबला प्रत्युत्तर म्हणून स्वतःचा बॉंब तयार करण्याची आवश्यकता नाही; बॉंब तयार करण्यामागे चीनचा उद्देश स्वतःला बडे राष्ट्र म्हणवून घेण्याचा, आशियायी राष्ट्रात दबदबा निर्माण करण्याचा, भारताचे आशियायी राष्ट्रांचे पुढारपण हिसकावून घेण्याचा, व विशेषतः अण्वस्त्रक्षेत्रातील पाश्चात्य राष्ट्रांची मक्तेदारी नष्ट करण्याचा असा विविध आहे. म्हणजे चीनचा अणुबॉंब लष्करी नसून राजकीय आहे; आणि म्हणून त्याला राजकीय पातळीवरूनच उत्तर दिले पाहिजे, असा एक विचारप्रवाह या संदर्भात आढळून आला. भारताने चीनच्या बॉंबला प्रत्युत्तर म्हणून स्वतःचा बॉंब तयार करण्याची जरूरी नाही हा काहींना दिलासा वाटला असल्यास नवल नाही. कारण भारताने बॉंब तयार केला तर तो आशियायी राष्ट्रांच्या सहानुभूतीला व विशेष म्हणजे पाश्चात्य राष्ट्रांच्या आर्थिक मदतीला पारखा होईल अशी काहींना साधार भीती वाटते. पंतप्रधान लालबहादूरशास्त्री आणि कॉंग्रेसच्या इतर काही धुरीणांनी गुंतूर व दुर्गापूर येथे भारतीय बॉंबच्या पुरस्कर्त्यांना निरनिराळ्या दृष्टिकोणातून उत्तर देण्याचा प्रयत्न केला असला तरी त्यांचा मुख्य भर नैतिक दृष्टिकोणावरच होता असे म्हणावयास हरकत नाही. पण मुळात नैतिक दृष्टिकोण गौण आहे हेही तितकेच खरे आहे. चीन अण्वस्त्रदृष्ट्या अमेरिका व रशिया यांच्या तोडीचे राष्ट्र बनावयाचे झाल्यास पंचवीस वर्षे लागतील असे 'न्यूयॉर्क टाईम्स'च्या वुइल्यम् लॉरेन्स या शास्त्रीय बातमीदाराच्या एका लेखाच्या आधारे पंतप्रधान शास्त्रींनी एक निवेदन करून चीनच्या अणुबॉंबची भीती बाळगण्याचे कारण नाही असे जे प्रारंभी सूचित केले होते ते या संदर्भात लक्षात ठेवण्यासारखे आहे. चीनने अणुबॉंब तयार केला असला तरी अणुशक्तीच्या शांततामय उपयोगामध्ये भारत फारच पुढे आहे, स्वतः चाऊ एन् लाय याने पूर्वी मान्य केल्याप्रमाणे चीन अणुविज्ञानात भारतापेक्षा दहा किंवा पंधरा वर्षांनी पाठीमागे आहे असा लोकसभेला दिलेला दिलासाही या संदर्भात उल्लेखनीय आहे. अणुविज्ञानात भारत चीनच्या पुढे असल्यामुळे मनात आणील तर तो चीनच्यापेक्षाही मोठे बॉंब तयार करू शकेल व चीनपासून दहा-पंधरा वर्षे तरी भारताला भीती नसल्याने एवढ्या काळापर्यंत भारताला अण्वस्त्रांचा विचार करण्याचे कारण नाही, असे यावरून गृहीत धरण्यात आल्याचे दिसते. भारताचे अण्वस्त्रविषयक धोरण पूर्णपणे नैतिक विचारावर आधारलेले नाही हे यावरून स्पष्ट होईल. ॲटोमिक एनर्जी कमिशनचे डॉ. भाभा यांनी जोपर्यंत निःशस्त्रीकरण झालेले नाही तोपर्यंत प्रतिहल्ल्याची आपली तयारी पूर्ण असली पाहिजे. शिवाय अणुबॉंब तयार करण्याचा खर्च भारताच्या आवाक्याबाहेरचा मुळीच नाही, व इतर राष्ट्रेही चीनचे अनुकरण करण्याची शक्यता आहे इत्यादि विचार या संदर्भात प्रकट केले. नंतर त्यावर सारवासारव झाली असली तरी जाणत्या लोकांचे विचार कोणत्या दिशेने धावत आहेत याची त्यावरून कल्पना येते. स्वतः पंतप्रधान शास्त्रींनी भारताचे अण्वस्त्रविषयक धोरण भविष्यकाळात बदलणार नाही असे मुळीच नाही असे स्पष्टच म्हटले आहे. या सर्व



अनुक्रमणिका

गोष्टीवरून भारताचे अण्वस्त्रविषयक धोरण शुद्ध नैतिक पायावर आधारलेले नाही हे स्पष्ट होते.

भारत अण्वस्त्राना नेहमीच विरोध करीत आला आहे; निःशस्त्रीकरण परिषदेमध्ये त्याने हिरीरिने पुढाकार घेतला आहे; चाचणी प्रयोगबंदीकरारावर त्याने सहीही केली आहे; अशा परिस्थितीत त्याने स्वतः बॉम्ब तयार करणे कितपत योग्य होईल ? शिवाय एक-दोन बॉम्बमुळे भारताला काही अण्वस्त्र राष्ट्रांचा दर्जा प्राप्त होणार नाही; म्हणजे भारताला मोठीच अण्वस्त्रयोजना हाती घ्यावी लागेल-आणि चीन बरोबरीच्या आत्मघातकी अण्वस्त्र स्पर्धेत तो अपरिहार्यपणे ओढला जाईल. भारतासारख्या मागासलेल्या राष्ट्राच्या आर्थिक जीवनावर याचे दूरगामी परिणाम होणे अटळ आहे. पण सर्वात महत्त्वाचे म्हणजे भारताचे तटस्थतेचे परराष्ट्रीय धोरण अणुबॉम्बमुळे कोलमडून पडेल; इतकेच नव्हे तर त्याला आक्रमक स्वरूप प्राप्त होईल. अशा विविध कारणासाठी भारताने अण्वस्त्रे तयार करू नयेत अशा निर्णयाला काँग्रेसचे धुरीण आले असून त्या धोरणाचे नैतिक पातळीवरून केले जाणारे समर्थन केवळ सोयिस्कर म्हणूनच केले जाते असे समजले पाहिजे. गांधी-नेहरूंच्या देशाने अण्वस्त्रे तयार करणे चुकीचे होईल हे शास्त्री प्रभृतींचे म्हणणे अगदीच दांभिक अगर प्रचारकी आहे असा याचा मुळीच अर्थ नाही. आपला नैतिक दृष्टिकोण कितीही उच्च असला तरी देशाची धुरा वाहणाऱ्यांना देशाच्या हिताच्या दृष्टीने वस्तुस्थितीचे यथार्थ आकलन असणे व कालपरिस्थित्यनुसार आपल्या धोरणामध्ये योग्य तो बदल घडवून आणण्यांची त्यांची तयारी असणे जरूर असते, हेही आपण लक्षात घेतले पाहिजे एवढाच याचा अर्थ. परराष्ट्रीय धोरण हे प्रचलित राजकीय परिस्थितीच्या संदर्भात ठरते हे खरे असेल तर कोणत्याही राष्ट्राला ते धोरण निरपेक्ष व अचल तत्त्वावर-राजकीय अगर नैतिक -आधारता येणार नाही हे उघड आहे. अण्वस्त्रे नसलेल्या भारतावर छोट्या ( कुलपी गोळेवजा ) अण्वस्त्रांनिशी मर्यादित हल्ला करून किंवा धाकदपटशाने (Nuclear blackmail) चीन आपले मर्यादित उद्दिष्ट साधण्याचा प्रयत्न करणे अशक्य नाही. कारण चीन हे ओळखून आहे की मर्यादित युद्धात, मर्यादित उद्दिष्टासाठी भारत पाश्चिमात्य राष्ट्राकडून अण्वस्त्रांची मदत घेणार नाही. कारण भारताला जागतिक अण्वस्त्र-युद्धाला त्यामुळे तोंड फुटेल याची भीती आहे. म्हणून चीनला मर्यादित युद्धापासून परावृत्त करावयाचे झाल्यास भारतानेही स्वतःची छोटी ( व मोठी ) अण्वस्त्रे तयार करून ठेवली पाहिजेत. ( याला लष्करी भाषेत Nuclear deterrent किंवा अण्वस्त्र-हल्ला-निवारक किंवा अण्वस्त्र-धमकी म्हणतात. ) हे व्यावहारिक राजकारण आहे; आणि देशाच्या संरक्षणासाठी ते आवश्यक आहे. नाहीपेक्षा भारताला चीनच्या दमदाटीला किंवा चीन बरोबरीच्या मर्यादित युद्धात शरणागती पत्करण्यावाचून गत्यंतर उरणार नाही. अण्वस्त्र-धमकीचा हा पर्याय अर्थातच चीनच्या उद्दिष्टांच्या व संभाव्य हालचालींच्या अंदाजावर ठरेल. या दृष्टीने भारताचे अण्वस्त्रविषयक धोरण परिस्थित्यनुसार बदलण्याची शास्त्रींनी बोलून दाखविलेली शक्यता वास्तववादी दृष्टिकोणावरच आधारली आहे असे म्हटले पाहिजे. पण हे मान्य करूनसुद्धा भारताला दुटप्पीपणाच्या आरोपातून निसटता येणार नाही हे उघड आहे. ज्या भारताने अण्वस्त्राचा इतके दिवस धिक्कार केला व अण्वस्त्रधारी राष्ट्रांना त्यांचा त्याग करण्यास सांगितले त्या भारताने स्वतः अण्वस्त्रे तयार करणे कोणत्याही दृष्टीने समर्थनीय ठरणार नाही.

पण अण्वस्त्रे तयार करणे किंवा चीनच्या धाकदपटशाला बळी पडणे असे भारतापुढे पर्याय नाहीत. भारतापुढे तिसरा एक पर्याय आहे. आणि तो म्हणजे अण्वस्त्रयुक्त राष्ट्रांनी अण्वस्त्रहीन राष्ट्रांच्या संरक्षणाची हमी द्यावयाची; आपण ती मागावयाची. पण या बाबतीतही अनेक अडचणी आहेत. पहिली गोष्ट म्हणजे ही हमी कोणत्या राष्ट्रांनी द्यावयाची ? अर्थात् अमेरिका व रशिया यांनी, पण त्यांच्यामध्ये या बाबतीत एकमत होईल का हा प्रश्न आहे. रशियाने या योजनेला पाठिंबा दिला तर हिंदी महासागरातील बेटावर अण्वस्त्रतळ उभारण्याच्या पाश्चात्य योजनेला रशियाने मंजुरी दिल्यासारखे होईल. दुसरे म्हणजे ही हमी पाश्चात्य राष्ट्रांनी स्वतःहून दिली आहे. तिला मुद्दाम शस्त्रसंधीचे अगर लष्करी कराराचे स्वरूप देण्याची जरूरी नाही. तिसरी गोष्ट अशी की ही हमी उघड उघड चीनच्या



अनुक्रमणिका





आक्रमणाविरुद्ध द्यावयाची असल्याने चीनला जगाच्या राजकारणातून वगळण्याचा हा प्रयत्न ठरतो. हा निःशस्त्रीकरणाचा प्रश्न सुलभ करण्याचा प्रयत्न नसून बिकट करण्याचा प्रयत्न आहे. खरे, चीनचाही त्यात समावेश करावयाचा झाल्यास चीनवर विश्वास ठेवावा लागेल. पण मग तो विश्वास आताच का ठेवू नये ?

अण्वस्त्र छत्राची कल्पना पुढे करण्याचा उद्देश केवळ अण्वस्त्रे नसलेल्या राष्ट्रांना अण्वस्त्रांच्या हल्ल्या-पासून संरक्षण मिळावे हाच नाही; तर त्याना स्वतःची अण्वस्त्रे तयार करण्याचा मोह होऊ नये हाही आहे. पण इतिहास काय सांगतो ? अण्वस्त्रापासून संरक्षणाची हमी मित्र राष्ट्रांकडून ब्रिटन, फ्रान्स व चीन या राष्ट्रांना मिळाली नव्हती असे नाही. तरीसुद्धा या राष्ट्रांनी स्वतःची अण्वस्त्रे तयार केली आहेत. म्हणजे अण्वस्त्रांची निर्मिती केवळ संरक्षणासाठी झालेली नाही हे सत्य आपण प्रथम लक्षात घेतले पाहिजे. बड्या राष्ट्रात स्वतःची गणना व्हावी म्हणून लहान राष्ट्रांना अणुबाँब हे एक भयानक विलोभन असून त्याचा नायनाट करण्याचा अण्वस्त्र छत्र हा खासच उपाय नव्हे. याहूनही मूलभूत असे काहीतरी केले पाहिजे. भारताला मोठेपणासाठी अर्थातच अणुबाँबची जरूरी नाही. तथापि चीनसारख्या शेजारच्या आक्रमक राष्ट्राने अणुबाँब तयार केल्यानंतर भारतासारख्या तटस्थ राष्ट्राला स्वतःच्या हमीची गरज वाटावी हे स्वाभाविक आहे. म्हणजे भारताची अण्वस्त्रांची गरज अगर अण्वस्त्र छत्राची कल्पना–मुळात असुरक्षिततेच्या भावनेतून निर्माण झाली आहे. पण ही असुरक्षिततेची भावना साधार आहे काय ? भारताला चीनच्या अण्वस्त्राच्या आक्रमणाची भीती खरोखर आहे काय ? आणि यासाठी भारताला अण्वस्त्रांच्या मदतीची खरोखरीच जरूरी आहे काय ?

भारतापुढे अण्वस्त्रांचा पर्याय ठेवणाऱ्यांनी दोन गृहीतकृत्ये मानलेली दिसतात. पहिले गृहीतकृत्य म्हणजे रूढ (Conventional) शस्त्रास्त्रामध्ये कितीही वाढ केली तरी त्यामुळे राष्ट्राचे संरक्षण परिणामकारक-पणे होणार नाही. दुसरे गृहीतकृत्य म्हणजे अण्वस्त्रे तयार करण्यामागे चीनचा आक्रमणाचा हेतू आहे; आणि हे आक्रमण थोपविण्याचा भारताजवळ अण्वस्त्राखेरीज दुसरा कोणताही परिणामकारक उपाय नाही. ही दोन्हीही गृहीतकृत्ये चुकीची आहेत. पहिले गृहीतकृत्य अण्वस्त्रे हे आधुनिक लष्करी डावपेचाचे अविभाज्य अंग आहे त्यांची दमदाटी गंभीरपणे विचारात घेतली पाहिजे असे मानते. पण अण्वस्त्रे हे संरक्षणाचे अविभाज्य अंग आहे असे मानणाऱ्यांच्या हातून निःशस्त्रीकरणासाठी प्रयत्न होणे सुतराम् शक्य नाही. ( म्हणूनच बड्या राष्ट्रांच्या निःशस्त्रीकरणाचे घोंगडे वीस वर्षे भिजत पडले आहे. ) दुसऱ्या गृहीत-कृत्याला भारतावरील चीनच्या आक्रमणाच्या ताज्या इतिहासामुळे थोडा अर्थ प्राप्त झाला आहे. पण चीनने रूढ अस्त्रानी आक्रमण केले म्हणून अण्वस्त्रांनीसुद्धा तो आक्रमण करील किंवा त्यांचा दमदाटीसाठी उपयोग करील असे समजणे कितपत बरोबर होईल ? अण्वस्त्र-युद्धात बेचिराख झालेल्या भांडवलशाही जगावर चीन नवीन व सुंदर साम्यवादी संस्कृती उभारील–म्हणजे साम्यवादाच्या विजयासाठी अण्वस्त्रयुद्ध अटळ आहे–या माओने १९६३ साली केलेल्या घोषणेला राजकीय प्रचार यापेक्षा जास्त किंमत नाही. शिवाय चीन-जवळ जेव्हा अणुबाँब नव्हता तेव्हा ती घोषणा केलेली आहे हे लक्षात ठेवले पाहिजे. नुकतेच माओने तिसरे महायुद्ध अण्वस्त्रांनी लढले जाणार नाही, तर रूढ अस्त्रांनीच लढले जाईल असे घोषित केले आहे. चीनचा दृष्टिकोण सुधारल्याचा व त्याची जबाबदारीची जाणीव वाढल्याचा हा पुरावा आहे. चीन युद्धपिपासू किंवा अगदीच बेजबाबदार आहे असे समजण्याचे कारण नाही. चीनची ही जबाबदारीची जाणीव तीव्र व अधिक सखोल करावयाची झाल्यास त्याला जगाच्या राजकीय जीवनात ओढले पाहिजे. या दृष्टीने संयुक्त-राष्ट्र-संघात चीनला प्रवेश मिळवून देण्याचा भारताचा अलीकडे मंदावलेला प्रयत्न शोच-नीय म्हटला पाहिजे. चीनच्या भारतावरील आक्रम-णाने, विशेषतः त्याच्या अणुबाँबच्या निर्मितीने या प्रयत्नाची निकड कमी झालेली नसून जास्त झाली आहे. चीनच्या अणुबाँबला प्रत्युत्तर म्हणून स्वतःचा बाँब तयार करण्याची अगर अण्वस्त्र छत्राखाली जाण्याची जरूरी नसून चीनच्या बाँबमधील राजकीय शक्ती काढून घेण्याची जरूरी आहे. त्यामुळे जागतिक






अण्वस्त्र समस्येच्या सोडवणुकीला भारताने किंचित् तरी हातभार लावल्यासारखे होईल.

भारताने अण्वस्त्रांचा प्रश्न स्वतःपुरता मर्यादित आहे असे न समजता जागतिक परिस्थितीच्या संदर्भात तो तपासला पाहिजे. भारताला अण्वस्त्रांचा प्रश्न या विशाल दृष्टिकोणातून हाताळावयाचा झाल्यास प्रथम अण्वस्त्रांचा इतिहास नीट समजावून घेतला पाहिजे. कारण आज भारतापुढे जी समस्या निर्माण झाली आहे तीच समस्या कमीजास्त फरकाने २५ वर्षापूर्वी अमेरिकेपुढे निर्माण झाली होती; आणि अमेरिकेने या समस्येची उकल चुकीच्या मार्गाने केल्यामुळेच आज जगापुढे अण्वस्त्रांचे संकट उभे राहिले आहे. भारताने या इतिहासापासून बोध घेतला पाहिजे. चीनच्या अणुबाँबने भारतापुढे व सामान्यतः अण्वस्त्रांनी जगापुढे निर्माण केलेली ही समस्या नीट समजावून घेण्यासाठी हा इतिहास थोडा नजरेखालून घालणे उद्बोधक होईल.

## अण्वस्त्रांचा जन्म भीतीतून झाला

अण्वस्त्रांचा शोध योगायोगाने लागला अगर शुद्ध वैज्ञानिक शोधाचा लष्करीदृष्ट्या दुरुपयोग करण्यात आला अशा समजुती क्वचित् दिसून येतात. पण दुसऱ्या महायुद्धाने अण्वस्त्रांना जन्मास घातले आहे ही वस्तुस्थिती आहे. दुसरे महायुद्ध झाले नसते तर अण्वस्त्रांचा शोध लागला नसता असा याचा अर्थ नव्हे. दुसऱ्या महायुद्धाच्या अभावी अण्वस्त्रांचा शोध फारच विलंबाने व अगदीच भिन्न परिस्थितीत लागला असता. अगदी अलीकडे, म्हणजे १९३९ साली (अणुबाँबच्या स्फोटाच्या पाचच दिवसापूर्वी) प्रसिद्ध अणुवैज्ञानिक नील्स बोहर याने आपला मित्र विग्नेर यास अणुशक्तीचा व्यावहारिक उपयोग अशक्य असल्याबद्दल पंधरा बळकट कारणे सांगितली होती. त्याचप्रमाणे आईन्स्टाईनने वुइल्यम लॉरेन्सला अणूपासून व्यावहारिक-लष्करी-उपयोगासाठी शक्ती निर्माण करणे शक्य होईल असे आपणास वाटत नाही असे स्पष्ट म्हटले होते. स्वतः अणुविद्लनाचा शोध लावणारा नोबेल पारितोषिक विजेता ओटो हान याने आपल्या शोधाच्या व्यावहारिक उपयोगाविषयी बोलताना, 'ही गोष्ट परमेश्वराच्या इच्छेविरुद्ध आहे!' असे आलंकारिक भाषेत उद्गार काढले होते, पण अणुविज्ञानात अधिकारी समजल्या जाणाऱ्या या सर्व शास्त्रज्ञांच्या कल्पनेविरुद्ध व अपेक्षेविरुद्ध अणुशक्तीचा व्यावहारिक -लष्करी उपयोग अगदी थोड्याच अवधीत मोठ्या स्फोटानिशी घडून आला; आणि याचे मुख्य कारण म्हणजे दुसऱ्या महायुद्धाने निर्माण केलेली राजकीय आणि लष्करी निकड!

न्यूट्रॉनच्या साखळी-प्रतिक्रियेमुळे मोठ्या प्रमाणावर अणुशक्ती निर्माण होणे–म्हणजेच अणुबाँब निर्माण करणे–शक्य आहे याची कल्पना प्रथम ज्या थोड्या शास्त्रज्ञांना सुचली होती त्यामध्ये झिलार्ड हा एक होय. जन्माने हंगेरियन व अमेरिकन नागरिकत्व पतकरलेल्या या शास्त्रज्ञाची कल्पनाशक्ती कालापेक्षाही जास्त वेगाने धावत असे. १९३५ साली, म्हणजे ज्यावेळी अणुशक्तीच्या निर्मितीच्या शक्यतेची कल्पनासुद्धा कित्येक शास्त्रज्ञांच्या मनाला शिवली नव्हती त्यावेळी अणुशक्तीविषयीचे संशोधन लष्करीदृष्ट्या महत्त्वाचे असल्याने ते गुप्त ठेवावे अशी योजना या शास्त्रज्ञाने मांडली होती! याच झिलार्डने अणुबाँब तयार करण्यासंबंधी रूझवेल्टला एक निवेदन पत्र लिहिण्यास आईन्स्टाईनचे मन वळविले, व आईन्स्टाईनच्या या निवेदनपत्रानेच शेवटी अमेरिकेच्या अणुबाँब योजनेला जन्म दिला.

अमेरिकन सरकारला अणुबाँब निर्माण करण्यासाठी प्रवृत्त करण्यास झिलार्डने का प्रयत्न केला व स्वतः आईन्स्टाईन रूझवेल्टला यासंबंधी निवेदनपत्र लिहिण्यास का तयार झाला हे येथे महत्त्वाचे प्रश्न ठरतात. अमेरिका ही योजना हाती घेण्यास का तयार झाली हाही तितकाच महत्त्वाचा प्रश्न आहे. १९३५ सालापासून झिलार्डला अणुशक्तीचे लष्करी महत्त्व कळले असले तरी त्याच्याही बऱ्याच पूर्वी म्हणजे १९३३ साली न्यूट्रॉनच्या साखळी–प्रतिक्रियेची कल्पना त्याला सुचली होती. त्याच वर्षी जर्मनीमध्ये हिटलर सत्तारूढ झाला होता, अणुविद्लनाचा शोध लावणारा ओटो हान या जर्मन शास्त्रज्ञाने हिटलरने अणुबाँब मिळविला तर आपण आत्महत्त्या करू असे म्हटले असले तर सर्वच जर्मन शास्त्रज्ञांना काही असे याविषयी वाटत नव्हते. १९३९ साली हिटलरने युद्धाला सुरवात केल्यानंतर व त्याचे आक्रमक स्वरूप पाहिल्यानंतर झिला-








अनुक्रमणिका

डेला संशय आणि चिंता यानी ग्रासून टाकले. युद्ध सुरू झाल्यानंतर जर्मन शास्त्रज्ञांनी अणुविज्ञानात केलेल्या प्रगतीची माहिती काही अंशी प्रसिद्ध झाली होती. याच सुमारास जर्मनीच्या युरेनियम योजनेची एक गुप्त बातमी अमेरिकेला येऊन पोचली. त्यावरून व हिटलरच्या आक्रमक स्वरूपावरून अणुबाँबच्या निर्मितीची हिटलरला खात्री असली पाहिजे असा अणुवैज्ञानिकांचा-यामध्ये झिलार्ड, विग्नेर व एडवर्ड टेलर हे प्रमुख होत-व नंतर स्वतः अमेरिकन सरकारचा ग्रह झाला. अमेरिकन सरकारला जर्मन अणुबाँब योजनेच्या अस्तित्वाविषयी इतकी खात्री होती की जर्मनीचा पाडाव झाल्यानंतर सुद्धा हिटरचा अणुबाँबचा कारखाना असला पाहिजे या कल्पनेने अमेरिकेच्या युद्ध अधिकाऱ्यांनी त्याचा कसून शोध केला. त्याना अर्थातच एक युरेनियम कारखाना सापडला. पण त्याने फारशी प्रगती केली नव्हती. जर्मन अणुबाँब हा कपोलकल्पित आहे याची कल्पना अगोदर असती तर आपण अमेरिकन सरकारला अणुबाँब तयार करण्यास प्रवृत्त केले नसते असे काही शास्त्रज्ञांनी याविषयी नंतर बोलून दाखविले. स्वतः आईन्स्टाईन म्हणाले, " If I had known that the Germans would not succeed in constructing the atom bomb, I would never have lifted a finger. " अशारीतीने हिटलर अणुबाँब तयार करील व त्याचा आक्रमणासाठी वापर करील या भीतीतून पहिला अणुबाँब निर्माण झाला आहे.

झिलार्ड, विग्नेर, टेलर, आईन्स्टाईन इ. शास्त्रज्ञांना आपण कसल्या भयंकर योजनेसाठी अमेरिकन सरकारला प्रवृत्त करीत आहोत याची कल्पना नव्हती असे नाही. पण या शास्त्रज्ञांचा अमेरिकन सरकारच्या जबाबदारीच्या जाणिवेवर इतका विश्वास होता की हे भयंकर अस्त्र अमेरिकन सरकार केवळ स्व-संरक्षणासाठीच म्हणजे अशाच अस्त्राने हल्ला झाला तरच-वापरील असे त्यानी गृहीतच धरले होते. पण याबाबतीत आपण मोठ्याच भ्रमात आहोत हे त्याना लवकरच कळून आले. पण ते हताश झाले नाहीत. जे अस्त्र स्वतः होऊन अमेरिकेला आपण दिले आहे त्याचा हल्ल्यासाठी वापर होऊ न देण्यासाठी प्रयत्न करणे हे आपलेच कर्तव्य आहे हे ओळखून झिलार्ड पुन्हा दुसऱ्या खेपेला आईन्टाईनकडे आला. आणि पाच वर्षांपूर्वी अणुबाँब तयार करण्याची सूचना देणाऱ्या आईन्स्टाईनने या खेपेस अणुबाँबचा वापर करू नये म्हणून अमेरिकन सरकारला पत्र लिहून सांगितले. स्वतः झिलार्डने आईन्स्टाईनच्या पत्रासोबत स्वतःचे एक निवेदन पाठविले. या निवेदनात झिलार्डने अमेरिकेने क्षणिक लष्करी फायद्यासाठी दूरगामी राजकीय नुकसान करून घेऊ नये असे स्पष्ट बजावले होते. शिवाय अणुशक्तीचे उत्पादन आंतरराष्ट्रीय नियंत्रणाखाली व्हावे, अमेरिकेचे पोलीस रशियात व रशियाचे पोलीस अमेरिकेत तपासणीसाठी यावेत, व राष्ट्रीय सार्वभौमत्वाला मर्यादा घालावी अशा अभूतपूर्व योजनाही त्यात त्याने मांडल्या होत्या. पण हे पत्र व निवेदन रूझवेल्टच्या नजरेखाली जाण्यापूर्वीच रूझवेल्ट वारले. रूझवेल्टच्या मृत्यूनंतर सेक्रेटरी ऑफ् स्टेट म्हणून ज्याची नेमणूक झाली त्या बिर्नेसची झिलार्डने व्यक्तिशः भेट घेतली व त्याच्यापुढे हे निवेदन-पत्र ठेवले. पण बिर्नेसला त्यावेळी एवढ्या दूरदृष्टीने विचार करण्याची गरजच नव्हती.[१] तो झिलार्डला म्हणाला, " तुम्ही विनाकारण डोक्याला त्रास देत आहात. माझ्या माहितीनुसार रशियामध्ये युरेनियमच नाही. "

रूझवेल्टच्या मृत्यूनंतर ट्रूमन अध्यक्ष झाले. ट्रूमननी वार सेक्रेटरी स्टिम्सनच्या सल्ल्यावरून अण्वस्त्रांच्या प्रश्नाचा विचार करण्यासाठी एक ' इंटेरिम कमिटी ' नेमली. या कमिटीत पाच राजकारणी आणि सात शास्त्रज्ञ होते. याच कमिटीने जपानवर बाँब टाकण्याचा निर्णय घेतला.[२] यानंतर शिकॅगो विद्यापीठाने अणु-

१. रूझवेल्टने झिलार्डच्या अणुबाँब तयार करण्याच्या सूचनेचा ५ वर्षांपूर्वी जितक्या गंभीरपणे विचार केला होता तितक्या गंभीरपणे बिर्नेसने झिलार्डच्या प्रस्तुत सूचनांचा विचार केला असता तर जगाच्या इतिहासाला नवीन वळण लागले असते- जगाचा इतिहास पूर्णपणे बदलला असता असे एका शास्त्रज्ञाने यासंबंधी म्हटले आहे.

२. असे सांगतात की या कमिटीपुढे विचारासाठी ठेवलेला प्रश्न जपानविरुद्ध बाँबचा उपयोग करावा काय हा नव्हता, तर तो कसा करावा हा होता.



अनुक्रमणिका






शक्तीचा सर्वांगीण दृष्टींनी विचार करण्यासाठी एक कमिटी नेमली. या कमिटीचा रिपोर्टच 'फ्रँक रिपोर्ट' या नावाने प्रसिद्ध असून तो सात शास्त्रज्ञांच्या सह्यांनी प्रसिद्ध झाला आहे. ( प्रत्यक्षात मात्र झिलार्ड, फ्रँक, रॅबिनोविच या शास्त्रज्ञांनीच तो लिहिला आहे. ) या रिपोर्टात या शास्त्रज्ञांनी अण्वस्त्रांविरुद्ध कसलेच संरक्षण विज्ञानाला शोधून काढता येणार नाही असे स्पष्टपणे जावले होते, या अस्त्राविरुद्ध एकच परिणामकारक संरक्षण आहे; आणि ते म्हणजे जगाची नवीन राजकीय संघटना होय असे या शास्त्रज्ञांनी त्यात म्हटले होते. अमेरिकेने हे अस्त्र मानवाविरुद्ध कसल्याही परिस्थितीत वापरू नये असे त्यानी त्यात आग्रहाने सांगितले आहे. " If the United States were to be the first to release this new means of indiscriminate destruction upon mankind, she would... precipitate the race for armaments and prejudice the possibility of reaching an international agreement on the future of such weapons. " अमेरिकेने या भयंकर अस्त्राचा मानवाविरुद्ध वापर केला तर या अस्त्राबाबत भविष्यकाळात आंतरराष्ट्रीय समझोता घडून येणे अशक्य होईल व अस्त्रस्पर्धेला प्रारंभ होईल असे त्यानी त्यात बजावले होते. फ्रँक रिपोर्टचे हे भविष्य आज खरे ठरले आहे. अमेरिकेने निर्जन प्रदेशात आंतरराष्ट्रीय संघापुढे या अस्त्राचा प्रयोग करून दाखवावा व म्हणावे, " पहा, आम्ही कसले अस्त्र तयार केले होते. पण आम्ही ते वापरले नाही. इतर राष्ट्रे आमच्याशी सहमत होतील तर आम्ही या अस्त्राचा त्याग करण्यास व त्यावर आंतरराष्ट्रीय नियंत्रण स्वीकारण्यास तयार आहोत " अमेरिकेने असे केले तर अण्वस्त्रांविषयी आंतरराष्ट्रीय समझोता घडवून आणणे सुलभ होईल असे या शास्त्रज्ञांनी त्यात सुचविले होते. पण फ्रँक रिपोर्टातील या व इतर सर्व सूचनांचा अव्हेर झाला. दोन अब्ज डॉलर खर्च करून ओक रिज्, हॅनफोर्ड, लॉस ॲल्मॉस इ. ठिकाणी बॉंब तयार करण्यासाठी उभारलेली जगड्व्याळ यंत्रणा व तेथे काम करणाऱ्या लाखो कामगारांचे श्रम शेवटी फुकटच जाणार का? हा विचार अमेरिकेच्या युद्ध खात्यातील अधिकाऱ्यांच्या मनात त्यावेळी प्रामुख्याने होता. इतकेच नव्हे तर मॅनहाटन या नावाने ओळखल्या जाणाऱ्या या बॉंब योजनेचा प्रमुख जनरल ग्रूव्ज याला आपला अणुबॉंब तयार होण्यापूर्वी युद्ध संपेल म्हणून सारखी भीती वाटत होती असे सांगतात! ट्रूमनने आपल्या आठवणींमध्ये आपण अणुबॉंब टाका असे म्हटल्यामुळे जपानवर अणुबॉंब टाकण्यात आला असे म्हटले आहे. पण जनरल ग्रूव्हज म्हणतो की बॉंब टाकू नका असे म्हणण्याचे ट्रूमनला धैर्य नव्हते, म्हणून तो टाकण्यात आला. म्हणजे ट्रूमन हा युद्धखात्याचा एक निष्क्रिय भाग बनला होता. नंतर ट्रूमनने अणुबॉंबच्या हल्ल्याने मोठ्या प्रमाणात होणारी संभाव्य प्राणहानी आपण टाळली असे आपल्या कृत्याचे समर्थन केले. अण्वस्त्रे स्वतःचे असे एक तर्कशास्त्र व मानसशास्त्र निर्माण करीत असून अण्वस्त्रे तयार करणारे राष्ट्र ती तयार केल्यानंतर त्याच्या तर्क व मानसशास्त्राच्या पूर्ण आहारी जाते, हे यावरून उघड होते. अण्वस्त्रे तयार करू इच्छिणाऱ्या राष्ट्राने अण्वस्त्रे तयार करण्यापूर्वी याचा पूर्ण विचार केला पाहिजे.

## अण्वस्त्रांमुळे नीतिमत्तेची पीछेहाट

भारताने आपले अण्वस्त्रविषयक धोरण पुढील नीतितत्वावर खंबीरपणे आधारले पाहिजे. हे नीतितत्त्व म्हणजे अण्वस्त्र हे कसल्याही परिस्थितीत संरक्षणाचे साधन बनू शकत नाही. हे नीतितत्त्व वस्तुस्थितीवर आधारले आहे. ही वस्तुस्थिती म्हणजे अण्वस्त्र- मग ते कितीही लहान असो- हे रूढ ( Conventional ) अस्त्राहून गुणात्मकरीत्या भिन्न आहे. या वस्तुस्थितीविषयी दुमत नसले तरी अत्यंत लहान अण्वस्त्रे तयार करून हा फरक गुणात्मकावरून संख्यात्मकावर आणण्याचा लष्करी प्रयत्न होत असल्याचे दिसून आले आहे. सर्वात लहान अणुबॉंबची शक्ती सर्वात मोठ्या रूढ बॉंबच्या शक्तीइतकीच असते असे सांगण्यात येते.[३]

३. हल्ली अस्तित्वात असलेला सर्वात लहान अणुबॉंब म्हणजे डेव्हीक्रॉकेट नावाचा २० टन TNT शक्तीचा अणुबॉंब होय. ( हिरोशिमावर टाकलेला अणुबॉंब २०,००० टन TNT शक्तीचा होता. ) हा डेव्ही क्रॉकेट अणुबॉंब दुसऱ्या महायुद्धात जर्मनीविरूद्ध वापरण्यात आलेल्या ब्लॉकबस्टर नावाच्या सर्वात मोठ्या रूढ



अनुक्रमणिका






आणि म्हणून अशा अणुबॉम्बचा वापर युद्धात रूढ बॉम्बप्रमाणे करण्यास हरकत नाही अशी एक विचार-सरणी रूढ होऊ पाहात आहे. गोल्डवाटरने याच भूमिकेवरून आपल्या अध्यक्षपदाची निवडणूक लढवली. आपल्याकडेही ही विचारसरणी क्वचित् दिसून येते. चीनने लहान अणुबॉम्बनी मर्यादित आक्रमण केले तर ते थोपवून धरण्यासाठी अगर परतून लावण्यासाठी भारतानेही असले बॉम्ब स्वतःजवळ बाळगले पाहिजेत असा हा विचार आहे. मर्यादित अणुयुद्धाची भाषा वेडेपणाची आहे हे प्रथम आपण लक्षात घेतले पाहिजे. रूढ अस्त्रांमध्ये आणि अण्वस्त्रांमध्ये गुणात्मक फरक नाही या समजुतीवरच हे सर्व विचार आधारले आहेत. पण ही समजूत मुळातच चुकीची आहे. रूढ बॉम्बने मनुष्य मरेल किंवा जखमी होईल. पण अण्वस्त्राने तो मरेल किंवा मेला नाही तर बोन कॅन्सर, ल्युकेमिया इ. किरणोत्सर्गजन्य रोगांमुळे यातना सहन करीत जीवन जगेल व शेवटी तडफडत मरेल. रूढ बॉम्बने हल्ला झालेले लोकच मरतील; पण अण्वस्त्रांनी हल्ला न झालेल्या लोकांच्या जीवनावर, त्यांच्या भावी संततीवर अनिष्ट परिणाम होतील: त्यांना मेलेली किंवा रोगी संतती निपजेल. रूढ आणि अणुबॉम्बमधील हा गुणात्मक फरक कितीही लहान अण्वस्त्रे निर्माण करून नाहीसा करता येणार नाही. हा गुणात्मक फरक नाहीसा करण्याचा किंवा लहान अण्वस्त्रांचे समर्थन करण्याचा हा प्रयत्न नैतिक दृष्टिकोणात अलीकडे घडून आलेल्या विलक्षण बदलाचा द्योतक म्हटला पाहिजे. नैतिक बंधने झुगारून देण्याकडे झुकलेला हा आधुनिक कल जितका अनपेक्षित तितकाच चिंताजनक आहे.

रूढ अस्त्रे आणि अण्वस्त्रे यांच्यामध्ये गुणात्मक फरक आहे हे बड्या राष्ट्रांना मान्य असले तरी अण्वस्त्रे हे संरक्षणाचे साधन बनू शकत नाही हे त्यांना मान्य नाही. अमेरिका, रशिया व ब्रिटन या राष्ट्रांचे संरक्षणविषयक धोरण पूर्णपणे अण्वस्त्रांवर आधारले आहे. या अण्वस्त्रांच्या तर्कशास्त्रानुसार एकाद्या राष्ट्राजवळ अण्वस्त्रांचा साठा जितका मोठा, ही अस्त्रे वाहून नेणारी रॉकेट्स जितकी वेगवान्, जितकी दूरगामी व अचूक, तसेच शत्रुराष्ट्राच्या अण्वस्त्र हल्ल्याची सूचना देणारी रडारयंत्रे जितकी कार्यक्षम, अण्वस्त्र हल्ल्याच्या या रडारच्या सूचनेमध्ये आणि प्रतिहल्ला चढविण्यामध्ये निघून जाणारा वेळ जितका कमी—म्हणजे विचार करण्यास जितका कमी अवधी—तितके त्या राष्ट्राचे संरक्षण परिणामकारक ! जगातील प्रत्येक व्यक्तीला अनेकदा मारण्याइतकी संहारक अणुशक्ती हल्ली या राष्ट्राजवळ आहे. ( एका व्यक्तीला दोनदा मारता येत नाही हीच काय ती अडचण ! ) प्रसिद्ध शास्त्रज्ञ व नोबेल पारितोषिक विजेता लिनस पॉलिंग याने १९६३ साली केलेल्या अंदाजानुसार जगातील अण्वस्त्रांचा साठा ३२०,००० मेगॅटन इतका आहे[४]. दुसऱ्या महायुद्धात वापरण्यात आलेली एकूण स्फोटक दारूची शक्ती ६ मेगॅटन इतकी होती. ६ मेगॅटन इतके युद्ध—दुसऱ्या महायुद्धाइतके मोठे युद्ध—पहिल्या दिवशी झाले, व नंतर दररोज तितक्याच मेगॅटन इतके युद्ध झाले तर हल्लीची संहारक अणुशक्ती संपण्यास १४६ वर्षे लागतील ! पण ही सर्व अणुशक्ती बहुतेक एकाच दिवशी- तिसऱ्या महायुद्धाचे दिवशी—वापरली जाईल हे लक्षात घेता अण्वस्त्रयुद्धाची भयानकता लक्षात येईल. आणि तरीही अमेरिकेचा डिफेन्स सेक्रेटरी मॅक्नामारा म्हणतो की रशियाच्या मोठ्या अण्वस्त्र हल्ल्यातून अमेरिका वाचेल ! रशियाचा मोठा अण्वस्त्र हल्ला झाला तर प्रथम कशाचे संरक्षण कराल असे विचारले असता या क्षेत्रातील जबाबदार व्यक्तींनी हैड्रोजन बॉम्बचे व रॉकेट्सचे प्रथम संरक्षण करू असे स्पष्ट सांगितले आहे. मानवी जीविताविषयीच्या या लोकांच्या बेपर्वाईबद्दल आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. उलट त्यांनी स्वीकारलेल्या अण्वस्त्र—नीती ते धरूनच आहे. अमेरिकेच्या डिफेन्स सेक्रेटरीने रशियाने अण्वस्त्रांनी मोठा हल्ला केला तरी अमेरिका त्यातून वाचेल असे जे म्हटले आहे ते एका अर्थाने खरे आहे. अमेरिकन संस्कृती अर्थातच नष्ट होईल. पण अमेरिकेची अण्वस्त्रे वाचतील. आणि मग हे अण्वस्त्रनीतीतज्ज्ञ त्या अण्वस्त्रांनी

---

बॉम्बच्या दुप्पट शक्तिशाली आहे. पण या दोहोतील फरक म्हणजे सर्वात मोठा रूढ बॉम्ब खास विमानाने टाकावा लागतो. पण सर्वात लहान अणुबॉम्ब ट्रॅक्टरवरूनसुद्धा फेकता येतो.

४. एक मेगॅटन म्हणजे १०००,००० टन T N T (स्फोटक) दारूची शक्ती.



अनुक्रमणिका








रशियावर मोठा प्रतिहल्ला चढवतील व रशियन संस्कृती नष्ट करतील. कारण अण्वस्त्रांच्या तर्कशास्त्रानुसार अमेरिकन संस्कृती नष्ट झाल्याच्या दुःखापेक्षा रशियन संस्कृती नष्ट झाल्याचा आनंद अधिक आहे.

अण्वस्त्रे हे संरक्षणाचे साधन होऊ शकत नाही या दृष्टीकोणाला विरोधी दृष्टीकोण असे सांगतो की अण्वस्त्रांनीच जगात शांतता नांदणे शक्य आहे. काही लोकांनी अगदी मनापासून व सद्धेतूने हा दृष्टीकोण मांडला आहे. 'हैड्रोजन बॉंबचा जनक' एडवर्ड टेलर अमेरिकेच्या निःशस्त्रीकरणाच्या फॉरेन रिलेशन्स सबकमिटी पुढील साक्षीत म्हणाला, "I don't like weapons. I would like to have peace. But for peace we need weapons and I do not think my views are distorted. I believe I am contributing to a peaceful world." अण्वस्त्रांनी शांतता प्रस्थापित होते असे या शास्त्रज्ञाला प्रामाणिकपणे वाटते हे यावरून उघड आहे. अण्वस्त्रांनी शांतता प्रस्थापित होण्यामागील मानसशास्त्र टेलरने पुढील शब्दात सांगितले आहे: "It won't be until the bombs get so big that they can annihilate everything that people will realy become terrified and begin to take a reasonable line in politics... Those who oppose the H-bomb are behaving like ostriches if they think they are going to promote peace in that way." मनुष्याला बडग्याचा धाक दाखविल्यावेरीज तो नीतीने वागणार नाही असे हा दृष्टिकोण म्हणतो. मनुष्याच्या सद्भावनेवर व नैतिक प्रवृत्तींवर या दृष्टिकोणाचा विश्वास नाही. पण मनुष्याला भविष्यकालचा विचार करण्याची शक्ती आहे एवढे यामध्ये गृहीत धरले आहे. कारण या भयंकर अण्वस्त्रांनी हल्ला झाला तर कोणता प्रलय होईल याचे भविष्यकालीन चित्र ज्याना रेखाटता येते त्यानाच त्यांची भीती वाटेल, म्हणजे लोकांना भविष्यकालीन विचार करण्याचे सामर्थ्य आहे हे यात मान्य केले आहे. पण हॅरॉल्ड युरे या शास्त्रज्ञाला हेही मान्य नाही. आणि त्याचा दृष्टिकोण अधिक तर्कशुद्ध आहे असे म्हटले पाहिजे. कारण त्याच्यामते ज्यांना भविष्याचा विचार करता येतो त्यांना अण्वस्त्रांचा त्याग केला पाहिजे हे पटले पाहिजे. पण ते पटल्याचे चिन्ह दिसत नाही. आणि म्हणून युरेने प्रत्यक्ष युद्ध झाल्यावेरीज या लोकांना अण्वस्त्रांचा त्याग करण्याची आवश्यकता पटणार नाही व ते नीतीने वागणार नाहीत असे मत मांडले आहे ! आणि टेलर व युरे हे दोघेही जागतिक सरकारचे कट्टे पुरस्कर्ते आहेत हे लक्षात ठेवले पाहिजे. पण जागतिक सरकार प्रस्थापित करण्याच्या त्यांच्या या पद्धतीला 'पद्धत' म्हणणेही काहींना अवघड वाटेल. पहिल्या महायुद्धानंतर लीग ऑफ् नेशन्स अस्तित्वात आली व आंतरराष्ट्रीय संघटनेत मानवाचे पहिले पाऊल पडले. दुसऱ्या महायुद्धामुळे संयुक्त राष्ट्र-संघाची स्थापना झाली व आंतरराष्ट्रीय संघटनेमध्ये दुसरे मोठे पाऊल पडले. आता या संघटनेने तिसरे महत्त्वाचे पाऊल टाकावयाचे झाल्यास-जागतिक सरकाराची स्थापना व्हावयाची झाल्यास तिसरे महायुद्ध होणे आवश्यक आहे असा विचार या तर्कशास्त्राच्या बुडाशी दिसतो. पण जी गोष्ट दोन महायुद्धांनी घडली नाही ती तिसऱ्या महायुद्धाने घडेल असे समजणे चुकीचे आहे. जागतिक सरकार व जागतिक शांतता प्रस्थापित करण्याचा हाच एकमेव उपाय आहे असे काहींना प्रामाणिकपणे वाटत असेल तर त्याला नाइलाज आहे. जबाबदार व जाणत्या लोकांचीसुद्धा विवेकशक्ती अण्वस्त्रांमुळे कशी लुळी पडू शकते याचे हे उत्तम उदाहरण होय.

पहिल्या महायुद्धात ९८००,००० लोक मेले त्यामध्ये फक्त ५ टक्के लोक नागरिक होते. दुसऱ्या महायुद्धात ५२०००,००० लोक मेले. त्यामध्ये ४८ टक्के लोक नागरिक होते. कोरियन युद्धात ९,२००,००० लोक मेले. त्यामध्ये ८४ टक्के लोक नागरिक होते. युद्ध हे रणांगणावर केले जाते ही कल्पना चुकीची आहे, आधुनिक युद्धे म्हणजे निरपराध नागरिकांच्या सामूहिक कत्तलीची साधने कशी बनली आहेत हे यावरून उघड होईल. निरपराध नागरिकांच्या या हत्याकांडाच्या यंत्रणेसाठी ( शस्त्रास्त्रांसाठी व सैन्यासाठी ) नागरिकांचे हल्ली दररोज १·८ अब्ज रुपये खर्च होत आहेत. हा खर्च जे राष्ट्र जास्तीत जास्त प्रमाणात करते ते 'बडे' गणले जाते. अमेरिकेच्या वायव्य







किनाऱ्यावर क्वाकीयूल नावाचे आदिकालिक ( primitive ) लोक राहतात. त्यांच्यातील एकाद्या टोळीचा पुढारी एकादा पाहुणा घरी आल्यास त्याच्यापुढे आपल्या संपत्तीची गर्वोक्ती करतो, व आपली संपत्ती– वस्त्र, तांबे, नावा इ. – एकामागून एक जाळू लागतो. पाहुणा 'स्वाभिमानी' असेल तर तोही आपली संपत्ती मागवून घेतो आणि ती त्याच्यापुढे जाळू लागतो. जो पुढारी जास्तीत जास्त संपत्ती जाळतो. तो विजयी होतो– तो जास्त 'संपत्तिमान्' ठरतो. या क्वाकीयूल पुढाऱ्यांच्या संपत्ती जाळण्याच्या स्पर्धेत व बड्या राष्ट्रांच्या अण्वस्त्र–स्पर्धेत तत्त्वतः काहीच फरक नाही. या दोघांमध्ये आणखी एक साम्य आहे. क्वाकीयूल पुढाऱ्यांची संपत्ती जाळण्याची स्पर्धा सुरू असताना स्वतःच्या संपत्तीला लागलेल्या आगीने आपले शरीर होरपळून गेले तरी आपल्या जागेपासून त्यांनी हालणे कमीपणाचे समजले जाते. आपल्याच संपत्तीला आपणच लावलेल्या आगीने आपलेच शरीर होरपळले तरी ते आनंदाने सहन करणे यात मोठेपणा व स्वाभिमान नाही असे कोण म्हणेल ? या बाबतीत बडी राष्ट्रे क्वाकीयूल आदिकालिकांना हार जातील असे वाटत नाही. फरक इतकाच की या राष्ट्रांच्या संपत्तीला त्यांच्या सुधारलेल्या दर्जेनुसार अण्वस्त्रांनी आग लागेल, व ती राष्ट्रे स्वतःला सुधारलेल्या पद्धतीने– किरणोत्सर्गाने– होरपळून घेतील.

आल्फ्रेड झेंट–ग्योर्गी या नोबेल पारितोषिक विजेत्या जीवशास्त्रज्ञाच्या मते आधुनिक मानव अजून मुळात गुहामानवच ( cave man ) आहे. त्याची भौतिक प्रगती त्याच्या मानसिक उत्क्रांतीच्या तुलनेने प्रचंड वेगाने झाल्यामुळे तो स्वतःचा नाश ओढवण्याची शक्यता निर्माण झाली आहे. या गुहामानवाला गुहेतील विस्तव हाताळण्याचाच काय तो अनुभव आहे. अणुबॉंबमधील १५ दशलक्ष शतांशाची उष्णता त्याच्या आकलनशक्तीच्या पलीकडची आहे. त्याने गुहेतील एखाद-दुसऱ्या व्यक्तीचा मृत्यूच काय तो पाहिलेला आहे. कोट्यवधी लोकांचा क्षणार्धात होणाऱ्या किरणोत्सर्गीमृत्यूची तो कल्पनाच करू शकत नाही. त्याचे विचार अजून टोळी आणि जमातवादाच्या चाकोरीतूनच धावतात. त्याला 'आपले' आणि 'परके' हा भेद अजूनही महत्त्वाचा वाटतो. त्यामुळे त्याला धनुष्य–बाण सोडणे आणि अण्वस्त्रयुक्त अग्निबाण सोडणे यात काहीच फरक नाही असे वाटण्याची– त्याची रॉकेटच्या बटणावरील बोटे धनुष्याच्या दोरीवरील बोटाइतक्याच लीलेने चालण्याची भयानक शक्यता आज निर्माण झाली आहे. प्रसिद्ध विज्ञान लेखक सी. पी. स्नो म्हणतो, "Within at the most ten years, some of these bombs are going off... that is the certainty." पुढील दहा वर्षांत यापैकी काही अणुबॉंब तरी स्फोट पावणार हे निश्चित ! हे भविष्य बुद्धी बधिर करणारे आहे. दुसरा पर्याय शोधण्याचा प्रयत्न ते कुंठित करते. युद्ध अटळ आहे ही कल्पना पराभूत वृत्तीतून निर्माण होते. ज्या मानवाने ही शक्यता निर्माण केली आहे तोच मानव ती टाळूही शकतो. हा विचार प्रथम केला पाहिजे. हा विचार करावयांचा झाल्यास आपण निवडलेली दिशा चुकीची आहे हे मान्य केले पाहिजे, व माघार घेतली पाहिजे. पण भरधाव निघालेली गाडी माघार घेण्यापूर्वी प्रथम तिला ब्रेक लावावा लागतो. हा ब्रेक लावायचा म्हणजे नव्याने अण्वस्त्रे तयार करणाऱ्या राष्ट्रांना पायबंद घातला पाहिजे. हा पायबंद कोणी घालायचा ? भारत स्वतःला तरी पायबंद घालू शकतो !

लडाख, नेफा व भारताचा इतर भाग चीन गिळंकृत करू नये म्हणून अण्वस्त्रांवर न विसंबता लष्करीदृष्ट्या भारत काय करू शकेल हे चर्चिण्याचा येथे उद्देश नाही. दुसऱ्या महायुद्धाच्या ज्या हिटलरजनित परिस्थितीमुळे अमेरिकेने अणुबॉंब तयार केला ती परिस्थिती आज भारतापुढे नाही एवढे येथे सांगितले पाहिजे. हिटलर इतिहासजमा झाला आहे, व या अणुयुगात तो पुन्हा डोके वर काढील हे संभवनीय नाही. कदाचित् चीनमध्ये ( किंवा अन्यत्र ) नवीन हिटलर निर्माण झालाच तर त्याचा तोंडवळा निराळा असेल; त्याच्या पद्धती वेगळ्या असतील, आणि येथेच कल्पकतेची, नवीन पद्धतीने विचार करण्याची गरज निर्माण होते.[५] आम्ही अण्वस्त्रे तयार करून

५. फटकून वागणाऱ्या रशियाला जसे जागतिक नीतिनियमाखाली हळुहळु खेचले तसे चीनला, जागतिक जीवनाच्या प्रवाहात खेचणे अशक्य नाही.






कदाचित् चीनला आक्रमणापासून परावृत्त करू शकू किंवा पाश्चात्यांच्या गटात शिरून अगर त्यांच्याशी अण्वस्त्रकरार करून चीनच्या उरात धडकी भरावयास लावू. पण क्षणिक फायद्यासाठी ज्याप्रमाणे अमेरिकेने स्वतःचे व जगाचे दूरगामी नुकसान केले त्याप्रमाणे या क्षणिक फायद्यासाठी (आणि तो सुद्धा संशयास्पद) भारत दूरगामी नुकसान करण्याची शक्यता आहे हे विसरून चालणार नाही. पहिली गोष्ट म्हणजे— भारताच्या तटस्थ परराष्ट्रीय धोरणाचा विचार बाजूला ठेवला तरी— यामध्ये भारताचा नैतिक पराभव आहे. दुसरी गोष्ट म्हणजे जागतिक अण्वस्त्र समस्येच्या सोडवणुकीला यामुळे कसलाच हातभार लावल्यासारखे होणार नाहीं— उलट ती समस्या अधिकच बिकट केल्यासारखे होईल. तिसरी गोष्ट म्हणजे नागरिकांच्या जीविताचा विचार यामध्ये मुळीच केलेला नाही. देशाच्या संरक्षणाचा प्रश्न महत्त्वाचा नाही. असे कोणीच म्हणत नाही. पण आज मानवाच्या संरक्षणाचा प्रश्न निर्माण झाला. आधुनिक युद्धे कशी संहारक झाली आहेत, निरपराध नागरिकांच्या हत्येची ती कशी साधने बनली आहेत हे मागे सांगितलेच आहे. अण्वस्त्रांच्या डावपेचातील तज्ञ (Nuclear Strategists) संरक्षण-तज्ञ व राजनीति-तज्ञ आपापल्या क्षेत्रात कुशल व मोठे पंडित असतील, त्यांची राजकीय धोरणे व लष्करी योजना प्राप्त परिस्थितीत बरोबर असतील. पण भविष्यकाळात ही परिस्थिती बदलणार नाही व त्यांचे अंदाज चुकणार नाहीत असे नाही. मानवी हेतूसारख्या अनिश्चित व अनाकलनीय क्षेत्रात, असंख्य घटकांचा विचार करूनही गणितासारखा काटेकोरपणा व निश्चितता कधीच येणार नाही, आणि आपले अंदाज कदाचित चुकतील हे आपणास मान्य असेल तर त्यापासून होणाऱ्या परिणामांचा आपण डोके थंड ठेवून विचार केला पाहिजे. कारण आपण समजलो त्याप्रमाणे अण्वस्त्रे शत्रू राष्ट्राचा अण्वस्त्र हल्ला परिणामकारकपणे रोखून धरत नाहीत (Nuclear deterrent is no deterrent at all.) हे मग आपणास मान्य करावे लागेल. आणि हे जर आपणास मान्य असेल तर आक्रमण थोपविण्याच्या दृष्टीने निरुपयोगी पण मानवी जीविताच्या दृष्टीने धोकादायक अशा या अस्त्रांचा त्याग करणे समंजसपणाचे आहे हे कोणीही मान्य करील. आणि अण्वस्त्रांचा त्याग करणे समंजसपणाचे आहे हे मान्य करणारा त्याचे उत्पादन करणार नाही हे निराळे सांगसांगण्याची जरूरी नाही. समंजस माणसे नेहमीच पर्याय शोधतात; आणि अण्वस्त्रांना पर्याय नाहीत असे नाही.

---










श्री. मोहन रा. लिमये

# इंग्रजीचे शब्दोच्चार : आणखी काही अंगे व समस्या
## ( उत्तरार्ध )

पहिल्या लेखांकात मी इंग्रजी शब्दांचे उच्चार देवनागरीत देताना कोणत्या स्वरूपाच्या अडचणी येतात याचे, उपलब्ध इं.-म. शब्दकोशाच्या संदर्भात, विवेचन केले. आता या लेखांकात, इं.-म. कोशांमध्ये इंग्रजी शब्दोच्चाराच्या ज्या आणखी इतरही स्वरूपाच्या चुका आढळतात, त्यांचे दिग्दर्शन करण्याचे योजिलेले आहे; व त्याबरोबरच त्यांची दुरुस्ती आणि इतर उपाययोजना देण्याचे ठरविले आहे.

### स्वरोच्चार

ज्यांची इंग्रजी ही मातृभाषा आहे असे लोक इंग्रजी शब्दांचा वापर करताना जे स्वरोच्चार वापरतात ते तसेच देणे हे आवश्यक आहे. ( या ठिकाणी सोयीसाठी Southern British Dialect किंवा ' Received pronunciation, म्हणजेच लंडन्, ऑक्सफर्ड् यांच्या परिसरात ऐकू येणारी सुशिक्षितांची भाषा व उच्चार प्रमाणभूत म्हणून गृहीत धरले आहेत; आणि आपल्याकडील इं.-म. शब्दकोशांनी हाच उच्चार देण्याचा उद्देश पुढे ठेवलेला आहे असे दिसते. ) या प्रमाणभूत उच्चारांचा निकष लावल्यास असे आढळते की सध्या उपलब्ध असलेल्या सर्व इं-म. शब्दकोशांनी कमीअधिक प्रमाणात चुकीचे स्वरोच्चार दिलेले आहेत.

इंग्रजीमध्ये मराठी / अ /[१]शी जवळीक असलेले तीन स्वरोच्चार आहेत. ते अनुक्रमे / ʌ /, / əː / व / ə / या खुणांनी आंतरराष्ट्रीय उच्चारलिपीमध्ये दर्शविले जातात. तिसऱ्याचे उच्चारण मराठी / अ / सारखेच आहे. दुसरा दीर्घ अ असल्याने तो / अः / असा लिहिता येईल. परंतु पहिला स्वर मराठी / अ / पेक्षा जास्त खुला ( open )व ऱ्हस्वतम आहे. त्याच्या ह्या वेगळेपणाची जाणीव मी पाहिलेल्या कोणत्याच इं.-म. कोशात दिसत नाही. मग त्यासाठी स्वतंत्र चिन्हांचा वापर करणे दूरच राहिले. मग cut शब्दामधील अधोरेखित अक्षराचा उच्चार व again मधील अधोरेखित उच्चार हे भिन्न आहेत हे विद्यार्थ्यांना कोशावरून समजावे कसे ? उच्चारांबाबत जास्त काळजी घेऊन रचलेल्या 'साधना' कोशातसुद्धा हा गोंधळ दिसतो. त्यात mud हा शब्द / मड् / असा चुकीचाच आढळतो.

काही कोशांमध्ये ( उदा. ' साधना ' कोश ) मूळ शब्दांवरून साधित झालेल्या शब्दांचे (derivetives) फक्त स्पेलिंग दिलेले आहे. त्या साधित शब्दांचा उच्चार दिलेला नाही. तो देणे आवश्यक आहे, कारण साधित शब्दामध्ये बऱ्याच वेळा आघाताची जागा बदलते व त्याबरोबरच स्वरोच्चारही बदलतात. प्रि. सबनीस व डोळे यांच्या कोशाचे ( असे साधित शब्दांचे उच्चार दिलेले नसणे ) हे मोठेच वैगुण्य म्हटले पाहिजे. मूळ शब्दांतल्या स्वरोच्चारांपेक्षा निराळे स्वर त्यांची जागा साधित शब्दांमध्ये घेतात याचे एकच उदाहरण देतो.

photograph या शब्दाचा उच्चार / फोटग्राफ् / असा आहे. पण त्यावरून साधित झालेल्या photography या शब्दाचा उच्चार मात्र / फटॉग्रफि / असा होतो. किंकरांच्या कोशात स्वरोच्चाराचा हा बदल दिलेला नाही ही मोठीच चूक होय. त्या कोशात हा शब्द / फोटॉग्रफि ) असा आढळतो.

पूर्वार्धात उल्लेखिलेल्या प्रा. मा. का. देशपांडे यांच्या शब्दमालेमध्ये चुकीच्या स्वरोच्चारांची जी उदाहरणे सापडली त्यातील काही पुढे देत आहे.

(१) Professor हा शब्द / प्रफैस / असा त्यांनी दिलेला आहे, तो / प्रफेस / असा हवा.

( २ ) accurate हा शब्द / 'ॲक्युरिट् / असा हवा. तो / अक्युरिट् / असा चुकीचा दिलेला आढळतो. [ या शब्दात त्यांनी आघातही चुकीच्या अवयवावर दिलेला आहे. ]

१ : तिरप्या समांतर रेषांमधील अक्षरे उच्चार दर्शवितात.



अनुक्रमणिका







(३) tamato शब्द / ट'माटो / असा हवा; तो / टमेटो / असा दिलेला आहे. वगैरे.

'साधना' शब्दकोशात / ऽ / ही खूण कशासाठी वापरलेली आहे हे कोठेच स्पष्ट केलेले नाही. काही शब्दांमध्ये ती स्वराचे दीर्घत्व दाखविते [ उदा० bird / बऽड् / ], तर काही शब्दांमध्ये ती स्पेलिंगमधल्या 'र्' चे अस्तित्व दाखविते. एकच खूण निरनिराळ्या कार्यासाठी वापरल्याने जाणत्यांनासुद्धा घोटाळा उडतो, मग विद्यार्थ्यांची गोष्ट दूरच.

किंकर आणि वैद्य यांच्या कोशात so'cialist चा उच्चार / सो'शॅलिस्ट् / असा दिलेला आहे. त्यातील / ॲ / च्या जागी / अ / पाहिजे, Com'petitor हा शब्द / कॉम्'पिटिटर् / असा दिलेला आहे. यामध्ये दोन अवयवातील स्वरोच्चार चुकीचे दिलेले आहेत. हा शब्द / क'म्पेटिट*[२] असा हवा. त्याचप्रमाणे foot हा /फूट / असा दिलेला आहे. येथे ऱ्हस्व / उ / हवा. दीर्घ / उ / हा या प्रकारच्या शब्दांमध्ये महाराष्ट्रात अनेक वेळा ऐकू येणारा चुकीचा उच्चार आहे. glory हा शब्द / ग्'लोरी / असा दिलेला आढळतो. यातील दोन्ही स्वर चुकीचे आहेत. हा शब्द / ग्लॉ:रि / असा द्यावयास पाहिजे. pre'ferable / प्रि'फरबल् / असा नको, / प्रे' फ्रबल् / असा पाहिजे. अशा अनेक चुका आढळतात.

संयुक्त स्वरांच्या जागी शुद्ध स्वर वापरलेले आढळणे हा दोष अनेक कोशांमध्ये आढळतो. किंकराच्या कोशात जसा tour हा शब्द / टूर् / [ तो / टुअ* / असा वास्तविक हवा. ] असा आढळतो, त्याप्रमाणे के. भि. ढवळे (रानडे?) प्रकाशनामध्ये hero हा शब्द / ही'रो / असा दिलेला सापडतो. तो / 'हिअरो / असा पाहिजे. दोन्ही शब्दात / uə = उअ / व / iə = इअ / असे अनुक्रमाने संयुक्त स्वर हवेत. श्री. ढवळे प्रकाशनामध्ये executive हा शब्द / इग्झे'क्यूटिव्ह् / असा दिलेला आहे. यातील दीर्घ उ च्या जागी ऱ्हस्व उ उच्चार हवा.

शब्दांच्या शेवटी लागणाऱ्या प्रत्ययांच्या (Suffixes) उच्चारांचा विचार केला तर अनेक कोशात हे चुकीचे दिलेले आहेत असे आढळते. उदा.

१. ment हा प्रत्यय लागून साधित झालेल्या नामामध्ये या प्रत्ययाचा उच्चार / मन्ट् / असा होतो; पण सर्वश्री० लेले व किनरे, वीरकर इत्यादींच्या कोशांमध्ये तो / मेन्ट् / असा चुकीचा दिलेला आहे.

२ – able या प्रत्यया– (ending) बाबत तीच गोष्ट. विशेषणांमध्ये त्याचा उच्चार / अबल् / असा दिला पाहिजे. तो / एबल् / असा चुकीचा दिलेला आढळतो.

उदा० श्री. वीरकर यांच्या कोशात indefa'tigable हा शब्द / इन्डिफ'टिगेबल् / असा दिलेला आहे. यात दोन स्वर चूक आहेत. बरोबर उच्चार / इन्डिफॅटिगबल् / असा आहे. लेले–किनरे कोशात दिलेला 'comfortable हा शब्द.

३ / कॉम्फर्टेबल् / असा नसून / 'कम्फटबल् / असा आहे. –ative, –atory वगैरे endings चे उच्चार /–अटिव् /, / –अट्रि / असे दिले पाहिजेत. काही कोशामध्ये / अ / च्या जागी / ए / आढळतो.

लेले–किनरे कोशात adore, adorn यासारख्या शब्दांच्या उच्चारात पहिला अवयव / ॲ / असा दिलेला आहे. तो / अ / असा हवा. या प्रकारच्या अनेक शब्दांमध्ये हीच चूक आढळते.

### व्यंजनोच्चार

वास्तविक जे व्यंजन हवे त्याजागी दुसरेच किंवा एखादे अनाहूत व्यंजन अधिक घालणे वगैरे प्रकारचे उच्चारदोष सर्व कोशांमध्ये आढळतात. बहुतेक सर्व कोशामध्ये towel चा उच्चार 'टॉविल् किंवा 'टॉवेल असा चुकीचा दिलेला आहे. यातील / व् / हा अर्धस्वर (semi-vowel) अनावश्यक आहे.

मी पाहिलेल्या सर्व इं.– म. – कोशांमध्ये 'dj' ह्या व्यंजनसमूहाचा उच्चार / ड्ज् / असा चुकीचा आढळतो. उदा० 'adjective सारखे शब्द

---

२. ही स्पेलिंगमधील 'र्' या अक्षराचे अस्तित्व दर्शविते. पुढे स्वरोच्चार आल्यास R. P. मध्ये 'र्' चा उच्चार करतात.



अनुक्रमणिका






/ ॲ'ड्जिक्टिव्ह् / असे चूक आढळले. यामधील / ड् / हा व्यंजनोच्चार वगळला पाहिजे.

काही कोशांमध्ये mature या शब्दाचा उच्चार / मॅच्युअर् / असा दिलेला आढळतो. या ठिकाणी (पहिल्या अवयवातील स्वरोच्चाराची चूक जरा बाजूस ठेवू–मॅ च्या जागी म पाहिजे.) दुसऱ्या अवयवातील / च् / व्यंजनाच्या जागी / ट्यू / हे हवे. आघातयुक्त अवयवामध्ये (in a stressed syllable) / ट्यू /च्या जागी / च् / हा व्यंजनोच्चार (assimilation) येऊ शकत नाही, हा शब्द वीरकरांच्या कोशातही असाच चुकीचा आढळतो. याचा बरोबर उच्चार / मट्युअ * / असा आहे.

## / स् / आणि / ज् / यांची उलटापालट

हा दोष कांही इं.-म. कोशांमध्ये आढळला. उदा० 'साधना' कोशात preside हे क्रियापद / प्रिसैड् / असे आढळले. हा उच्चार / प्रिजाइड् / असा हवा. त्याचप्रमाणे स्पेलिंगमध्ये '×' हे व्यंजन असताना त्याच्या / क्स् / व / ग्ज् / ह्या उच्चारांची उलटापालट केलेली अनेकवार आढळते.

## व्यंजनद्वित्वाचा दोष

के. भि. ढवळे यांनी प्रकाशित केलेल्या कोशामध्ये, त्याचप्रमाणे वीरकरांच्या व लेले-किनरे यांच्या कोशांमध्ये हा दोष आढळतो. शब्दांच्या स्पेलिंग्जमध्ये व्यंजनाक्षरांचे द्वित्व दिसत असल्यामुळे उच्चारातही व्यंजनद्वित्व केले असावे. उदा० disseminate या क्रियापदाचा उच्चार या कोशांमध्ये / डिस्सेमिनेट् / असा दिलेला आहे. तो वास्तविक / डिसेमिनेःट् / असा हवा हाच प्रकार immortal, irrelevant इत्यादी शब्दांच्या उच्चारातही दिसतो. या शब्दांमधील अनुक्रमे / म् / व / र् / या व्यंजनोच्चारांचे द्वित्व टाळले पाहिजे. किंकरांच्या कोशातही immense, immerse या शब्दांच्या उच्चारात ही चूक आढळते. 'll' अशा अक्षरांच्या उच्चारातही / ल् /चे द्वित्व होत नाही. फक्त साधनेने प्रकाशित केलेल्या कोशात हा दोष आढळत नाही.

## चिन्हांच्या वापरातील विसंगती

एकाच ध्वनीचे लेखन करताना एकच खूण वापरली पाहिजे ही साधी अपेक्षासुद्धा अनेक शब्दकोश पुरी करीत नाहीत. उदा० लेले व किनरे यांच्या कोशात evoke, evolution इत्यादी शब्दातील 'v' या अक्षराचा ध्वनी / व् / या खुणेने दाखविला आहे. पण verb, vast वगैरे बहुसंख्य शब्दांमधील पहिल्या अक्षराचा ध्वनी वरच्याप्रमाणे तोच असताना त्यासाठी मात्र / व्ह् / या खुणेचा वापर केलेला आहे. हा गोंधळ क्षम्य आहे काय ? प्रा. देशपांडे यांच्या ज्या शब्दसंग्रहाचा मागे उल्लेख केलेला आहे त्यामध्ये हीच विसंगती (inconsistency) आढळते. ज्या शब्दसंग्रहामध्ये उदा० village, vineyard हे शब्द / विलिज् / / विन्यड् / असे दिलेले आहेत; पण provide, advantage वगैरे मात्र / प्रव्हाइड् /, / अड्व्हान्टिज् / असे दिलेले आढळतात. [ नमुन्यादाखल दिलेल्या चारही शब्दामधील V या अक्षराचा उच्चार सर्वत्र तोच आहे. ]

## उच्चारामधील अनावश्यक जादा (uuwanted, extra) व्यंजन

मागे 'dj' या व्यंजनसमूहाचा उल्लेख आलेलाच आहे. प्रा. देशपांड्यांच्या शब्दसंग्रहात या दोषाचे एक ठळक उदाहरण सापडले. त्यात annihilation या शब्दाचा उच्चार / अनाय्हिलेशन् / असा दिलेला आहे. त्यातील / ह् / हे आगंतुक व्यंजन काढून टाकले पाहिजे. या शब्दाचा उच्चार / अनाइअलेःशन् / असा द्यावयास पाहिजे.

प्रा. अधिकारी यांनी संपादिलेल्या कोशामध्ये subtle या शब्दाचा उच्चार / सब्टल् / असा आढळला. इंग्रजी भाषेची साधारण ओळख असलेल्या व्यक्तीलासुद्धा या उच्चारातील / ब् / हे व्यंजन जादा असून ते काढून टाकिले पाहिजे हे माहित असते. उच्चाराच्या चुकांचे जेवढे जेवढे प्रकार या लेखात उल्लेखिलेले आहेत त्या त्या प्रकारांच्या मुबलक चुका प्रा. अधिकारी यांच्या कोशात आढळतात; आणि तरी या कोशाला 'pronouncing dictionary' असे नाव देण्यात आलेले आहे.

'साधना' कोशाच्या प्रस्तावनेत असे म्हटलेले आहे की स्पेलिंगमध्ये असलेला पण R. P. नुसार जो अनुच्चारित असतो असा / र् / देवनागरी उच्चारामध्ये संपादकांनी दाखविलेला नाही. असे जर आहे तर tire व tyre या शब्दांच्या / टैअर् / या उच्चारामध्ये / र् / ह्या ध्वनीचा समावेश का केला आहे ? "'र्' चा उच्चार इंग्लिशमध्ये क्वचितच होतो" असे गोलमोल ( loose and unprecise ) विधान करण्यात अर्थ नाही. निश्चित केव्हा केव्हा होतो याचा नियम 'साधना' कोशकारांनी का दिला नाही ते कळत नाही.

येथवर स्वरोच्चार व व्यंजनोच्चार यांच्या विविध स्वरूपांच्या चुकांचा निर्देश केला. उपलब्ध इंग्रजी-मराठी शब्दकोशांमध्ये उच्चाराच्या चुकीचा आणखी एक प्रकार आढळतो. या चुका संख्यने कमी असल्या तरी त्यांचे गांभीर्य दुर्लक्षणीय नाही.

## आघात ( Stressing )

'इंग्लिश' शब्दकोश पुढे ठेवून इं.-म. कोशांना शब्दातील आघात दाखविता येत असल्याने वस्तुतः आघाताच्या चुका होण्याचे कारणच नाही. तरीही थोड्याशा चुका आढळतातच. उदा० किंकर आणि वैद्य यांच्या कोशात / फोटोग्राफ् / असा उच्चार आढळतो. या शब्दात आघात पहिल्या अवयवावर हवा, दुसऱ्या नको. त्याचप्रमाणे / टो / मधील स्वरोच्चार चूक आहे. त्याचप्रमाणे competitive या शब्दात आघात तिसऱ्या अवयवावर दाखविलेला आहे. तो दुसऱ्यावर हवा. तोच प्रकार / म्युनिफिसन्स / या उच्चाराचा. येथेसुद्धा आघात दुसऱ्या अवयवावर / म्युनिफिसन्स् / असा दाखववयास पाहिजे.

साधना कोशात haphazard हा शब्द / हॅफॅझ-ऽड् / असा चुकीचा आढळतो. आघात पहिल्या व दुसऱ्या अशा दोन्ही अवयवांवर दिला पाहिजे किंवा फक्त दुसऱ्यावर तरी दिला पाहिजे. ( याखेरीज या शब्दातील व्यंजनोच्चारपण चुकीचे दिले आहेत. हा उच्चार / हॅ पॅ जड् / असा आहे. ) तरी 'विचार-पूर्वक व साक्षेपाने तयार केलेला' कोश आहे हा !

वीरकरांच्या कोशात immature या शब्दाच्या उच्चारात / इम्मॅच्युअर् / आघात चुकीच्या अवयवावर दिलेला आहे. तो शेवटल्या अवयवावर हवा. [ या शब्दातील बाकीच्या चुका मागे दाखविलेल्या आहेतच. एकुण सर्व शब्द / इमट्युअ / असा लिहिता येईल. ]

प्रा. देशपांड्यांच्या शब्दमालेतील to-day च्या / टडे / या उच्चारात आघातच दिलेला नाही. तो दुसऱ्या अवयवावर / टडेः / हवा.

## आणखी काही उणिवा

आता या कोशांच्या उच्चारलेखनात ज्यामुळे काही कमतरता ( imperfections ) आलेली आहे अशा दोन-तीन न्यूनांचा, उणीवांचा उल्लेख करितो व हा लेख संपवितो. अर्थात् यांना चुका म्हणता येणार नाही.

## उपआघात

अनेकावयवी इंग्रजी शब्दांमध्ये सामान्यतः मुख्य आघातांबरोबरच ( kinetic stresses ) उपआघातही ( partial stresses ) असतात. असे उपआघातही, लेले-किनरे यांच्या कोशाचा अपवाद वगळून, मी पाहिलेल्या कोणत्याही इं.- म. कोशामध्ये दिलेले नाहीत. असे आघात असतात हेच माहीत नाही की त्यांच्याकडे दुर्लक्ष केलेले आहे हे कळत नाही. 'लेले किनरे' कोशात दोन्ही प्रकारच्या आघाताबद्दल एकच खूण वापरलेली असल्याने कोणता आघात मुख्य व कोणता 'उप' याचा उलगडा विद्यार्थ्यांना होणे शक्य नाही. या बाबतीत प्रा. Daniel Jones यांनी वापरलेल्या खुणांची योजना करणे योग्य होईल असे मला वाटते, [ 'साधना' कोशकार प्रा० जोन्ज यांच्या कोशाप्रमाणे उच्चार देत आहोत असे म्हणतात, याच प्रसंगी त्यांनी जोन्ज़्चे अनुकरण का केलेले नाही ! ]

## प्लुप रूपे ( weak forms )

संभाषणात्मक इंग्रजीमध्ये किंवा दररोजच्या वापरातील भाषेमध्ये शब्दांची जी रूपे उपयोगात आणली जातात ती रूपे ( weak forms of a number of structural words ) औपचारिक प्रसंगी वापरल्या जाणाऱ्या ( strong forms used in formal speech ) रूपांपेक्षा भिन्न असतात. ( मराठीतसुद्धा रोजच्या बोलण्यामध्ये आपण कुठं, तिनं, आलं



अनुक्रमणिका






वगैरे शिष्ट रूपांपेक्षा वेगळी अशी रूपे वापरतोच.) ही बोलभाषेतील रूपे व त्यांचे उच्चार देणे हे प्रत्येक शास्त्रशुद्ध शब्दकोशाचे कर्तव्य आहे. ही रूपे नेहमी बोलताना वापरली जातात. तेव्हा वापराचे प्रमाण किंवा संख्या ( frequency of occurrence ) हा निकष लाविल्यास week forms ना उलट अग्रहक्क दिला पाहिजे असे मी म्हणेन. साहाय्यकारी क्रियापदे व नकारार्थी प्रत्यय एकत्र करून वापरल्या जाणाऱ्या बोलभाषेतील छोट्या रूपांचे उच्चार ( pronunciation of contracted negatives) काही इं.–म. शब्दकोशांमध्ये आढळतात. उदा० don't डोन्ट्, can't कान्ट् वगैरे. पण मी पाहिलेल्या एकाही इं.–म. कोशाने सर्वनामे, साहाय्यकारी क्रियापदे (ज्याना 'anomalous finites' हे आधुनिक नाव व 'auxiliaries' हे जुने नाव आहे.), क्रियाविशेषण अव्यये इत्यादी– वाक्यरचनेमध्ये मोलाचे कार्य करणाऱ्या शब्दांचे ( structural words ) बोलण्यातील उच्चार ( weak forms ) दिलेले नाहीत.

उदा० १. him या सर्वनामाचे /
him=हिम् / strong form व
/ im=इम् / weak form
असे उच्चार,

२. can या साहाय्यकारी क्रियापदाचे
/ kæn=कॅन् / strong form व
/ kən, kn = कन् / weak forms
असे उच्चार,

३. always या क्रियाविशेषण अव्ययां (adverb) चे
/ 'ɔ : lweiz=ऑ : ल् वे : ज् / strong form
व / 'ɔ : lwəz = ऑ : ल् वज् / weak form
असे उच्चार –होतात. हे बोलण्यातील उच्चार एकाही इं.– म. कोशात न आढळणे हे त्यांचे फारच मोठे वैगुण्य आहे.

त्याचप्रमाणे काही कोशांमध्ये कोशकार कोणता उच्चारप्रकार देत आहेत ते प्रस्तावनेमध्ये त्यांनी स्पष्ट केलेले नाही. त्यामुळे वाचणाऱ्याला शंकास्थळे आली तर अधिकृत उच्चारांसाठी ( for authoritative pronunciation ) त्याने कोणत्या इं.–इं. कोशाकडे धाव घ्यावी बरे ? इंग्रजी ज्यांची मातृभाषा आहे अशा लोकांमध्ये उच्चाराच्या अनेक पद्धती प्रचलित आहेत. उदा० अमेरिकन्, ऑस्ट्रेलियन्, कनेडिअन् वगैरे, आणि खुद्द इंग्लंडमध्येच स्कॉटिश्, लंडन कॉक्नि, सुशिक्षितांची आर्. पी. (Received pronunciation) वगैरे. यांच्यामधील आपण कोणता प्रकार स्वीकारीत आहोत हे प्रत्येक कोशाच्या संपादकांनी प्रस्तावात स्पष्ट केले पाहिजे.

सरतेशेवटी एक बाब प्रा. जोन्ज् यांच्या उच्चारकोशात ज्या अवयवावर आघात आहे त्या अवयवाच्या **सुरवातीस** डोक्यावर आघातदर्शक एक उभी रेघ दिलेली असते. उदा० regard = / ri'ga:d / इंग्रजीचा परकीय भाषा म्हणून अभ्यास करणाऱ्यांना एखाद्या अवयवावर आघात आहे याची सूचना आधीच मिळणे इष्ट आहे हे सर्वांनाच मान्य होईल असे मला वाटते. या दृष्टीने पाहता कोणत्याच इं.– म. कोशाने ही पद्धत स्वीकारलेली नाही ही गोष्ट आश्चर्याची आहे. हे सर्व कोश ऑक्सफर्ड् कोशातल्याप्रमाणे आघातयुक्त अवयवानंतर तत्संबंधी खूण करतात. या गोष्टीचा उल्लेख करण्यामध्ये फक्त एका सोयीच्या बाबीची शिफारस करणे एवढाच हेतु आहे.











डॉ. के. वा. आपटे

# पञ्चैते तस्य हेतवः

मोक्षमार्ग म्हणून भगवद्गीतेने निष्काम कर्मयोग सांगितला आहे. निष्काम कर्मयोगामागची भूमिका व त्याचे मूलभूत तत्त्व ही दोन्ही पुढीलप्रमाणे सांगता येतात :– आसक्तीपूर्वक व फलाशेने कर्मे करीत राहिल्यास ती जीवाला बंधनकारक[1] होतात. प्रकृतीच्या गुणांनी मोहित झालेले लोक गुण आणि कर्म यांत[2] आसक्त होतात; आणि या गुण व कर्म यावरील आसक्तीने माणसांना जन्म-मरणाचे फेरे भोगावे[3] लागतात; माणसे कर्मबंधातच अडकून पडतात. पण 'गुणच गुणांच्या ठिकाणी आहेत,' हा निश्चय झाल्यास प्राणी आसक्त[4] होत नाही. निराळ्या शब्दात सांगायचे झाल्यास आसक्ती किंवा[5] संग सोडून फलाशा[6] न धरता, कर्मे केली तर ती बंधनकारक[7] न ठरता मोक्षदायक होतात; कर्मे करूनही जीवनाच्या परम पुरुषार्थाची प्राप्ती करून घेता येते.

## कर्मे निःसंगपणे करता येणे शक्य आहे काय ?

या कर्मयोगाचे बाबतीत असा एक प्रश्न उपस्थित होण्याची शक्यता आहेः– कर्मे निःसंगपणे करता येणे शक्य आहे काय ? स्वतःच्या कर्माबद्दल कर्त्याला आसक्ती वाटणे साहजिक नाही काय ? मग तो अनासक्तीने कसा कर्मे करू शकेल ?

भगवद्गीतेचे मांगणे आहे की कर्मे निःसंगपणे करता येणे सहज शक्य आहे. कर्मांचा कर्ता जर एकटाच कुणी असता तर त्याला कर्माबद्दल आपुलकी वाटण्याची शक्यता आहे. आणखी, जर तो वास्तविक कर्ता असेल तरीही त्याला कर्माबद्दल आसक्ती वाटण्याची शक्यता आहे. पण या दोन्हीही तऱ्हा खऱ्या नाहीत. कर्मांना एकच एक असा कर्ता नाही; प्रत्येक कर्मामागे पाच[8] कारणे आहेत. आणि तथाकथित कर्ता हा अहंकाराने मूढ होऊन स्वतःला कर्ता मानतो ही सत्य वस्तुस्थिति असल्याने कर्मे अनासक्तिपूर्वक करण्यात काहीच अडचण नाही.

## कर्मामागचे पाच हेतू

प्रत्येक कर्मामागचे हे पाच हेतू असे आहेतः– शरीर, वाचा आणि मन यांच्याकडून होणाऱ्या प्रत्येक कर्माला– मग ते कर्म न्याय्य असो अगर अन्याय्य असो- पांच[9] विविध हेतू आहेत. ते पुढील प्रमाणेः– अधिष्ठान म्हणजे शरीर, कर्ता, निरनिराळी[10] इंद्रिये,

---

१. अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते । ५·१२

२. प्रकृतेर्गुणसम्मूढाः सज्जन्ते गुणकर्मसु । ३·२९

३. कारणं गुणसंगोऽस्य सदसद्योनिजन्मसु । ३१·२१. तसेच १४·५–९ पहा.

४. गुणा गुणेषु वर्तन्ते इति मत्वा न सज्जते । ३·२८

५. योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय । २·४८

६. तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर ।
असक्तो ह्याचरन् कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ ३·१९

७. युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शान्तिमाप्नोति नैष्ठिकीम् । ५·१२

८. पञ्चैतानि महाबाहो कारणानि निबोध मे ।
सांख्ये कृतान्ते प्रोक्तानि सिद्धये सर्व कर्मणाम् ॥ १८·१३

९. शरीरवाङ्मनोभिर्यत् कर्म प्रारभते नरः ।
न्याय्यं वा विपरीतं वा पञ्चैते तस्य हेतवः ॥ १८·१६

१०. पांच ज्ञानेन्द्रियें, पांच कर्मेन्द्रियें








विविध व पृथक अशा चेष्टा[११] आणि पाचवे दैव. या पाच कारणांचा प्रस्तुत लेखात अधिक विचार केला आहे.

प्रत्येक कर्माला पाच हेतू आहेत आणि ती कारणे ' सांख्य[१२] कृतान्तात ' सांगितलेली आहेत, असा हवाला भगवद्गीतने दिला आहे. आणि हे मत भगवद्गीतेला मान्य आहे, हे " तत्रैवं सति ...[१३] दुर्मतिः " ( १८·१६ ) या श्लोकावरून स्पष्ट होते. तसेच, कर्मांची पाच कारणे सांगणारा हा श्लोक भगवद्गीतेने अठराव्या अध्यायात दिला आहे. पण तत्पूर्वीच्या अनेक अध्यायात गीतेने विविध दृष्टिकोनातून कर्मयोगाची मांडणी केली आहे. आणि गीतेला कर्मांच्या पाच हेतूंचे हे तत्त्व मान्य असल्याने, साहजिकच असे वाटते की अठराव्या अध्यायापूर्वी या पाच कारणांचा निर्देश व उपयोग भगवद्गीतेने केला असला पाहिजे. पण वरवर पाहिले तर असे दिसते की या पाच कारणांतील ' कर्ता ' सोडून इतर चारांचा निर्देश व उपयोग भगवद्गीतेने केलेला नाही. परंतु खरी वस्तुस्थिती तशी नाही. कारण सूक्ष्म दृष्टीने पाहिले तर असे दिसून येते की या पाचही हेतूंचा उल्लेख आणि उपयोग भगवद्गीतेने मागील अध्यायात केलेला आहे; पण त्या त्या ठिकाणी शब्द मात्र निराळे वापरले आहेत. हाच भाग पुढील परिच्छेदात चर्चिला आहे.

## कर्म प्रकृतीच करते

भगवद्गीतेच्या मते, सत्त्व, रज व तम हे गुण[१४] प्रकृतीपासून उद्भूत[१५] होतात ईश्वराच्या अध्यक्षतेखाली प्रकृति चराचर[१६] वस्तू निर्माण करते. ईश्वराची ही अपरा प्रकृति आठ प्रकारची आहे :— पृथिवी, जल, अग्नी, वायू व आकाश ही पंच महाभूते, आणि मन,[१७] बुद्धी व अहंकार. जगातील सर्व वस्तू पाच महाभूतांच्या विविध संयोगाने बनलेल्या आहेत. साहजीकच, शरीर व इंद्रिये वस्तुतः प्रकृतीचा परिणाम किंवा कार्य आहेत. मन हे प्रकृतीच्या आठ भागातील एक आहे. इंद्रियांचे बाह्य विषय हेही प्रकृतीचेच विकार आहेत. बुद्धी व अहंकार हेही प्रकृतीच्या आठ भागातील दोन आहेत. तेव्हा, देह, वाचा आणि मन यांचेकडून होणारे कर्म हे प्रकृतीच[१८] करते, हे म्हणणे संयुक्तिक ठरते. सत्त्व, रज आणि तम हे प्रकृतीपासून होतात; आणि प्रकृतीच्या प्रत्येक परिणामात ते[१९] उपस्थित आहेत. म्हणून प्रकृतीच्या गुणांकडून सर्व कर्मे केली[२०] जातात, '' गुणा गुणेषु वर्तन्ते '' ( ३·२८ ), असे म्हणता येते. किंबहुना प्रकृति-जन्य गुण हे माणसाकडून असहायपणे कर्मे करवून[२१] घेतात. या चर्चेवरून एक गोष्ट स्पष्ट होईल की अधिष्ठान व करण ही दोन कारणे जेव्हा कर्माची कारणे म्हणून सांगितली गेली

---

११. अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।
विविधाश्च पृथक् चेष्टा दैवं चैवात्र पञ्चमम् ॥ १८·१४

१२. सांख्य कृतान्त म्हणजे वेदान्तशास्त्र, ज्ञानशास्त्र किंवा वेदातील तत्त्वनिर्णायक भाग, असे अर्थ भगवद्गीतेच्या टीकाकारांनी दिलेले आहेत.

१३. तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः ।
पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥ १८·१६

१४. या बाबतीत भ. गी. चे मत सांख्यदर्शनापेक्षा वेगळे आहे. सांख्य तत्त्वज्ञानात हे तीन गुण म्हणजेच प्रकृति होय:— सत्त्वरजस्तमसां साम्यावस्था-प्रकृतिः ।

१५. सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः । १४·५

१६. मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् । ९·१०. तसेच ९·८ पहा.

१७. भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।
अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ अपरेयम् ॥ ७·४–५

१८. प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः । १३·२९; कार्यकरणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते । १३·२०

१९. न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ।
सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात् त्रिभिर्गुणैः १८·४०

२०. प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ३·२७

२१. कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः । ३·५








आहेत, तेव्हां प्रकृतीचे गुणच विविध रूपात कर्मांचे हेतू म्हणून अभिप्रेत आहेत.

भगवद्गीतेच्या म्हणण्याप्रमाणे, जीव हा ईश्वराचा[२२] अंश आहे. आणि खरे पाहिल्यास जीव हा काहीही करीत नाही. तो तीन गुणांच्या पलीकडे असून[२३] अकर्ता[२४] आहे. तथापि अहंकाराने मूढ होऊन जीवात्मा स्वतःला[२५] कर्ता समजू लागतो. निराळ्या शब्दात सांगायचे झाल्यास, अहंकाराने मोहित झालेला जीवात्मा हा कर्मांचा कर्ता[२६] होतो, पण तो केवळ एकटाच मात्र[२७] कर्ता नाही, हेही विसरता कामा नये.

एक कर्म-चेष्टा-[२८] केले की तेच दुसऱ्या अनेक कर्मांना कारणीभूत होते. व्यावहारिक उदाहरण द्यायचे झाले तर एकदा खोटे बोलले की ते लपविण्यास अनेकदा खोटे बोलण्याची पाळी येते. अशाप्रकारे, विविध व वेगवेगळी कर्मे ( चेष्टा ) ही इतर कर्मांची कारणे होतात. तसेच, चेष्टा ही शारीरिक, वाचिक किंवा मानसिक आहे. आणि तसे पाहिल्यास, मुळातच चेष्टेचे कारण प्रकृती किंवा तिचे गुण आहेत. परंतु ही चेष्टा स्वतंत्रपणे आणखी कर्मांना कारणीभूत होत असल्याने तिचा स्वतंत्र निर्देश केला गेला आहे.

## कर्मांचे अंतिम कारण

कर्मांचे अंतिम कारण दैव[२९] आहे. हे दैव म्हणजे नशीब[३०] किंवा अदृष्ट होय. आणि ते म्हणजे प्राण्याने केलेले पूर्वीचेच कर्म होय. या पूर्वकर्मांनुसार वर्तमान जीवनात माणसाला जन्म, विशिष्ट स्वभाव, इत्यादी प्राप्त झालेले आहेत. आणि प्रत्येकजण या स्वतःच्या स्वभावानुसार किंवा प्रकृतीनुसार [३१] कर्मे करतो. या दृष्टीने दैव हे कर्मांचे कारण आहे. भगवद्गीतेच्या म्हणण्यानुसार, शहाणा माणूस सुद्धा स्वतःच्या [३२] प्रकृतीप्रमाणे कर्मे करतो; कर्म करताना सर्वच प्राणी स्वतःच्या प्रकृतीवर जातात; त्याला [३३] अटकाव करता येत नाही. भलता अहंकार धरून, अमुक अमुक कर्म मी करणार नाही; असे जर कोणी म्हणू लागेल, तर त्याला ते कर्म [३४] करावयास प्रकृति भाग पाडते. ही प्रकृती किंवा स्वभाव कर्मांचे कारण आहे. [ प्रत्येकजण

२२. ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः । १५·७

२३. नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति ।
गुणेभ्यश्च परं वेत्ति ॥ १४·१९

२४. यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति । १३·२९

२५. अहंकार विमूढात्मा कर्ताहमिति मन्यते । ३·२७

२६. भगवद्गीतेच्या काही टीकाकारांनी कर्ता हा शब्द ईश्वराकडे–विष्णूकडे घेतला आहे ( कर्ता विष्णुः । मध्वाचार्य ), हे येथे नमूद करण्यास हरकत नाही.

२७. तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः ।
पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥ १८·१६

२८. चेष्टा म्हणजे पंचप्राणांची वृत्ति किंवा कर्म असा अर्थ भगवद्गीतेच्या काही टीकाकारांनी केला आहे. मध्वाचार्यांचे मते, चेष्टा म्हणजे क्रिया होय.

२९. दैव शब्दाचे विविध अर्थ भ. गी. च्या टीकाकारांनी दिलेले आहेत, ते असे :– चक्षु इत्यादि अनुग्राहक आदित्य, इत्यादि देवता ( शंकराचार्य ); परमात्मा अन्तर्यामी ( रामानुजाचार्य ); मध्वाचार्यांचे मते, दैव म्हणजे अदृष्ट होय.

३०. दैवं पुराकृतं कर्म. दैवं दिष्टं भागधेयम् ( अमर. १·४·२८ ).

३१. येथे प्रकृति–शब्दाने गुणांचे मूळ अशी प्रकृति अभिप्रेत नसून, स्वभाव अभिप्रेत आहे, हे लक्षात ठेवावे.

३२. सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि । ३·३३

३३. प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति । ३·३३

३४. प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति । १८·५९



अनुक्रमणिका






स्वतःच्या स्वभावज [35] कर्मांने बद्ध आहे. यालाच भगवद्गीतेने ' ' स्वभावनियतं कर्म ' ( १८·४७ ) किंवा ' सहजं कर्म ' ( १८·४८ ) असेही म्हटले आहे ].

पांच कारणांचे उपर्युक्त विवेचन पाहिल्यावर एक गोष्ट स्पष्ट होते की ' सांख्य कृतान्ता'तील ही पाचही कारणे फक्त दोनच कारणात अंतर्भूत होतात; आणि ती म्हणजे प्रकृती ( वा तिचे गुण ) आणि अहंकाराने मूढ झालेला जीवात्मा याच दोन कारणाचा उल्लेख व उपयोग भगवद्गीतेने अठराव्या अध्यायापूर्वीच्या अध्यायात केलेला आहे. आणि या दोन कारणाचाच अधिक विस्तार करून गीतेनें सागितलेली ' सांख्य कृतान्ता'तील पांच कारणे सिद्ध झाली आहेत.

---

३५. स्वभावजेन कौन्तेय निबद्धः स्वेन कर्मणा । १८·६०





अनुक्रमणिका






डॉ. पण्डित आवळीकर

# शांतपरंपरा : पुस्ती व दुरुस्ती

मी संपादित केलेल्या 'विवेकचिंतामणि'[१] या ग्रंथाच्या प्रस्तावनेत शांतलिंगस्वामींच्या शांतपरंपरेची मी विस्ताराने चर्चा केली आहे. माझ्या प्रस्तावनेत सदर परंपरेतील पन्नासावे पुरुष दशरथशांत यांच्याबद्दल पुढील माहिती मी दिली होती :— "या बसवलिंगाच्या शिष्याचे नांव पुन्हा शांतलिंग. 'हा संकेश्वरी' होता. आणि जातीने सारस्वत ब्राह्मण होता. याचा मुलगा दशरथशांत; शांतपरंपरेतील पन्नासावा पुरुष. याचा पुत्र दत्तात्रय शांत. याच्याच सुखबोध नावाच्या शिष्याने शांतपरंपरा सांगणारे प्रकरण लिहिले आहे."[२]

या माहितीत दुरुस्ती करणे व काही नवीन भर घालणे आवश्यक आहे. दशरथशांत हे या परंपरेतील पन्नासावे पुरुष हे बरोबर आहे. पण त्यांच्या पुत्राचे नांव 'दत्तात्रेय' नव्हे. संकेश्वर येथील 'शांत' घराण्याची वंशावळ अशीः—




यांपैकी श्री. बाबूराव शांत हे सध्या संकेश्वरी असून त्यांच्याच साहाय्याने मला काही नवीन माहिती मिळाली.

वंशावळीतील 'सातप्पा' हेच बसवलिंगाचे शिष्य 'शांतलिंग' होत. दशरथशांतांचे पुत्र शंकर. दशरथशांतांना सुखबोधाने दत्तात्रेयाचा अवतार म्हटले आहे. परंतु अनवधानाने माझी त्याबाबत चूक झाली ती लक्षात येताच दुरुस्त करीत आहे.

दशरथशांतांचा निधनशक एका कागदावर उतरलेला आढळला. तो उल्लेख असाः- "श्री।। शके १७५८ दुर्मुख नामसंवत्सर आश्वीन वद्य ८ मंगळवार पुष नक्षत्र घटी २३ योग घटी ३५ बालवा कर्ण घटी २७ तारीख २१ ते दीवसि तीसरे प्रहारी ती ।। श्री गुरु दशरथशांत देवाज्ञा होवुन देह ठेवीला ।।"[३] म्हणजे श. १७५८ मध्ये दशरथशांतांचे निर्याण झाले.

दुसरे दशरथशांत (श्री. बाबूरावांचे वडील) स. १९२० मध्ये निवर्तल्याचेही एका ठिकाणी नमूद झाले आहे[४] पहिल्या दशरथशांताच्या वेळचा, त्यांची व त्यांचे बंधू बाळकृष्ण व पुरुषोत्तम यांच्यामध्ये जी फारकत झाली "तो कागद मला पाहावयास मिळाला. हा फारकतीचा कागद कार्तिक शु. ८ शके १७२२ रौद्रनाम संवत्सर भृगुवासर" या दिवशी झाली. यावरूनही श. १७५८ हा दशरथशांतांचा निधनशक मानण्यास अडचण नाही.

दशरथशांतांचे वाङ्मय मला उपलब्ध होऊ शकले नाही. फक्त एक महालक्ष्मीची आरती मिळाली. ती अशीः—

क्षिरब्धीतनया प्रकृति मुळमाया ।।
भक्ता प्रसंनवदने अक्षइ गुणवर्या ।
अभक्त दुर्जन दुःखि दारद्र लाउनिया ।।
नाचरति तव भजनि नकळे सत्क्रीया ।। १ ।।
जयदेवि जयदेवि जय महालक्ष्मी ।
सदभावी आरती तुझिया पदपद्मी ।। जयदेवि ।।

१. श्रीनिजगुणशिवयोगीकृत 'विवेकचिंतामणि' कर्नाटक विश्वविद्यालय व पुणें विद्यापीठ संयुक्त प्रकाशन, क्र. १, जून १९६३.

२. उपर्युक्त, पृ. २३.

३. हा कालोल्लेख बरोबर आहे. शक, संवत्सरनाम, तिथि, वार यांचा मेळ बसतो. पाहा :— मोडकांची जंत्री, पृ. २६९

४. " दशरथ नारायण शांत हा ता. २९।१०।२० रोजी मयत जाहला. "






आखंड भजति भावे । तुजसि दिनरजनी ॥
पुत्र पौत्रा वैभव वसति त्या सदनी ॥
न कळे महिमा तुझी तु मन्मथजननी ।
**दशरथशांत** ध्यातो लय लाऊनि चरणी ॥ ३ ॥
जयदेवि ॥

शांतपरंपरेत अनेक धारा वाहात आहेत : अनेक दैवतांच्या उपासनांना तेथे वाव आहे; हे या आरतीवरूनही ध्यानी यावे. संकेश्वराच्या ' शांत ' घराण्यात शाक्त–उपासनाही आहे अशी माझी ऐकीव माहिती आहे. पण त्याचबरोबर एका वेगळ्याच आनंद–नाथ–परंपरेशी या परंपरेचा संबंध दिसतो. त्याबद्दल थोडेफार लिहिणे जरूरीचे आहे.

शांतांच्या पूजेत एक हस्तलिखित संस्कृत ग्रंथ आहे. त्याचे नांव " श्रीअर्चनापद्धती " हे हस्तलिखित साधारणपणे ४"×३" आकाराचे असून त्याच्या शेवटी पुढील निर्देश आहे :- " श्री चिदानंदनाथगुरु परंपराराधक श्रीमद्रारामानंदनाथ चरणपंकज प्रसादिक चिद्रूपानंदनाथेण लिख्यते पुस्तकं इदं श्री गुरु आराध्यलिंग प्रसादेन शुभं भवतु ॥ शके १६९३ वर्षे शुभकृत नाम संवत्सरे ग्रीष्मऋतौ भाद्रपद मासे वद्य दशमी भोमवासर तद्दिने पुस्तकं संपूर्ण ॥ "

कोणा चिदानंदनाथाच्या गुरुपरंपरेतील कोणा रामानंदनाथाच्या चिद्रूपानंदनाथ नावाच्या शिष्याने श. १६९३ हा ग्रंथ लिहिला ( नकलला ? ) असे यावरून कळते. ' श्रीगुरु आराध्यालिंग ' म्हणजे कोण, काय याचा शोध घ्यावयास हवा. त्याचप्रमाणे या ग्रंथाच्या पृ. १०४ वर ' गुरुक्रमपूजनं ' या शीर्षकाखाली दिलेली पुढील परंपरा मला नवीन व विचारार्ह वाटते.

परप्रकाशानंदनाथ––परशिवानंदनाथ––पराशक्ति––देव्यंबानंदनाथ–– कौळेश्वरानंदनाथ–– शुक्लदेव्यंबानाथ कुलेशानंदनाथ–– ( कामेश्वरीअंबा )–– भोगानंदनाथ क्लीनानंदनाथ–– समयानंदनाथ सहजानंदनाथ––विश्वानंदनाथ मदनानंदनाथ–– भुवनानंदनाथ––लीलानंदनाथ –– विमलानंदनाथ–– स्वात्मानंदनाथ–– प्रियानंदनाथ ही सर्वच नावे अभ्यसनीय आहेत. हस्तलिखिताचा अधिक अभ्यास करून पुढे मागे या परंपरेसंबंधी काही सांगणे शक्य होईल.

शांतपरंपरेत ' विवेकसिंधू'ला स्थान होते असे मत श्री. रा. चिं. ढेरे यांनी मांडले आहे. ' विवेकचिंतामणी ' संबंधी माझ्याशी केलेल्या प्रकट चर्चेत ते म्हणतात : = या शिवाय शांतलिंगांच्या परंपरेतील विवेकसिंधूची एक प्रत भा. ओ. रि. इन्स्टिट्यूटच्या संग्रहात ( क्र. ७५५ ) आहे.[५] सदर प्रतीतील काही उतारे भांडारकर इन्स्टिट्यूटकडून मी मागविले होते. त्यावरून ' श्रीशांता ' या निर्देशाचा संबंध शांतलिंगांशी लावावा असे काही मला वाटत नाही. सदर प्रत कोणी केली व केव्हा केली हे कळू शकत नाही. शांतलिंगांच्या वाचनात ' विवेकसिंधु ' हा ग्रंथ असणे शक्य आहे. ' विवेकचिंतामणि ' व ' विवेकसिंधु ' यातील एक साम्यस्थळ मी दाखविले आहे,[६] परंतु शांतपरंपरेच्या संशोधनात मला या बाबतीत निर्णायक मत देण्याइतका पुरावा अजून उपलब्ध झालेला नाही. या परंपरेचा एका आनंद–नाथ परंपरेशी असू शकणारा संबंध तेवढा सध्या अभ्यासकांपुढे ठेवावासा वाटला.

---

५. इंद्रायणी, मार्च; एप्रिल १९६४, पृ. २४.
६. ' विवेकचिंतामणि ' प्रस्तावना, पृ. ८१.










श्री. ना. बा. मराठे

# भाषिक अस्मितेचा समन्वय

प्रत्येक भाषेला स्वतःची अशी एक विशिष्ट अस्मिता असते. कधी कधी तिची जागृती जाणवल्याशिवाय राहात नाही. 'सोनार बाङला' म्हणून बंगाली माणूस अभिमानपूर्वक बंगालीचा निर्देश करतो. 'तेलुगू ही पूर्वेकडील इटालियन' भाषा आहे याची आन्ध्रवासी यांना प्रौढी वाटते. भारतातील सर्वात जुनी भाषा व वाङमयही तितकेच प्राचीन याचा कटाक्षाने उल्लेख केल्याशिवाय 'तमिळ्' भाषिकाला स्वनामधन्यता वाटणार नाही. संस्कृतमधील ध्वनी हे विकारी आहेत म्हणजे मूळ क, च, ट, त, प या ध्वनींना कमी अधिक जोर ( aspiration ) देऊन त्यांचे पाच वर्ग बनवले गेले अतएव संस्कृतमध्ये क वर्गादी पाच वर्ग निर्माण झाले. वस्तुतः कचटतप या मूळ ध्वनींतच पाचही वर्ग समावलेले आहेत. तमिळ् भाषेसारख्या जुन्या भाषेनेच हे मूळ ध्वनी अजून याथार्थ्याने टिकवून धरलेले आहेत त्यामुळेच क च ट त प या पंचाक्षरांनीच संस्कृतच्या पंचवर्गाचे काम तमिळ् करू शकते असा एक दावाही ऐकण्यात आला. जगातील आद्य वाङमय फक्त संस्कृत भाषेतच आहे आणि ती जगातील कोणत्याही क्लासिकल् भाषांपेक्षा समृद्ध आहे ही संस्कृतज्ञांची निष्ठा आहे. सबंध भारताची राष्ट्रभाषा म्हणून होण्याची योग्यता असणारी भाषा म्हणून हिंदीची श्रेष्ठता कित्येक राजकीय पुढाऱ्यांच्या तोंडून ऐकली आहे. राष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय व्यवहार ज्या भाषेतून लीलया होऊ शकतात त्या इंग्रजी भाषेसंबंधी काय वर्णन करावे ? अमृताते पैजा जिंकण्याची भाषा तर मराठीच्या आद्य आचार्यांनीच लिहून ठेवली आहे. या भाषिक अस्मितेचा अन्वयार्थ लावणे हे आजच्या राजकीय परिस्थितीत खरोखरच कठीण काम आहे. 'न ब्रूयात्सत्यमप्रियम्'–असा मनूचा दंडक असूनही 'सत्यं ब्रूयात्' प्रियं ब्रूयात्' सहज पटणारे सत्य असेल तर मांडावयास हरकत नसावी.

## हिंदी हीच राष्ट्रभाषा ?

राष्ट्रवादाच्या आहारी गेलेल्या भारतीय राजकीय पुढाऱ्यांनी हिंदुस्थानची हिंदी ही बहुजनांची भाषा (Majority language) आहे म्हणून राष्ट्रभाषा व्हावी असा मसुदा मांडला आणि जर्मनीची जर्मनी, जपानची जपानी, इटालीची इटालियन्, फरान्सची फरेंच, स्पेनची स्पॅनिश या धर्तीवर हिंदीला राष्ट्रभाषेच्या महत्पदावर अभिषिक्त केले. भावनांच्या आहारी गेलेल्या जनतेला त्यावेळी विचार करण्यास पुरेशी फुरसत नव्हती. पण ते तत्त्व जेव्हा आता प्रत्यक्षात येण्याचा क्षण येऊन गुदरला त्यावेळी तीच राष्ट्रवादी अस्मिता तितक्याच प्रखरपणे जागृत झाली. त्याच तत्त्वाला धरून तामिळनाडची तमिळ्, बंगालची बंगाली, आसामाची आसामी, ओडिया, मराठी, तेलुगू, गुजराती, इत्यादी भाषावार प्रांतरचनेने खतपाणी घालून परिपुष्ट केलेल्या अस्मिता तितक्याच तीव्रतेने जाणवू लागल्या. भाषासमितीने (Language commission) तर त्या अस्मितेला आणखीनच फुंकर घातली. 'ऊर्ध्वबाहुर्विरोम्येष न च कश्चिच्छृणोति मे' चा त्यातील भाष्यकारांनी आवाज उठविला. आणि तेथूनच 'हिंदी ही राष्ट्रभाषा' या तथाविध प्रचारात आलेल्या कल्पनेला खो मिळाला. १९५० साली हिंदीला राष्ट्रभाषेचा दर्जा ठरविणाऱ्यांना इतर भारतीय भाषांनाही घटनेप्रमाणे तोच दर्जा दिला जात होता याचा विसर पडला. भाषानिहाय प्रांतरचनेने प्रत्येक राज्याला आपल्या विभागातील भाषेतूनच राज्यकारभार हाकण्याची जणू मुभाच मिळाली. हळुहळू एकेका राज्याने आपापला राज्यकारभार त्या त्या विभागातील प्रमुख भाषेतूनच हाकण्याचे मनोदय वा मनसुबे जाहीर केले. आणि आता महाराष्ट्र गुजरात, पश्चिम बंगाल, मद्रास इत्यादी राज्यातून इंग्रजीबरोबर त्या त्या राज्यांच्या भाषांतूनही कायदे








कानू लिहिले जाऊ लागले. हिन्दीसाठी ४ लाखवरून केन्द्राचे वार्षिक बजेट १९६५-६६ साली एक कोट रुपयांवर जाऊन बसले.

## हिंदची घोडदौड

गेल्या पंधरा वर्षात या राजकीय अस्मितेतून मुक्तहस्ते मदत मिळत गेलेल्या हिंदी वाङमयात विलक्षण वाढ झाली आहे. सरकारी तिजोरीने मुक्त-हस्ताने या वाढीला हातभार लावला नसता तर? असा एक विचार पुष्कळदा मनाला चाटून जातो. आत्याबाईंना मिशा असत्या तर या धर्तीचाच तो विचार आहे हे थोडयाच वेळात लक्षात आल्यावर त्याला बाजूला सारावे लागते. एवढे मात्र खरे की ज्या प्रमाणात हिंदी प्रसार व वाढीसाठी केन्द्र व राज्यसरकारे यांनी जसा पाण्यासारखा पैसा ओतला तसाच तो इतर घटनामान्य भारतीय भाषांच्या प्रसारासाठी व वाढीसाठी ओतला असता तर भाषांच्या नकाशाचे वेगळेच चित्र दिसून आले असते. या आर्थिक मदतीने हिन्दी ग्रंथसंख्येत बेसुमार भर पडली आहे. गुणमान वाढले का? हा प्रश्न बाजूला सारू या! जगातील पुस्तकप्रकाशन करणाऱ्या राष्ट्रात हिंदुस्थानचा क्रमांक पहिल्या पाचात लागतो. प्रसिद्ध होणाऱ्या भारतीय प्रकाशनात निम्म्यापेक्षा अधिक पुस्तके केवळ इंग्रजीतूनच छापलेली असतात. इंग्रजीनंतर भारतीय भाषाभगिनीत पुस्तकसंख्येत हिंदीचाच पहिला क्रमांक लागतो. मात्र त्यातील बरी-चशी पुस्तके क्रमिक पुस्तके, सरकारी रिपोर्टस्‌ची भाषांतरे, ललितेतर साहित्य या विषयांचीच असतात. ललित साहित्यात बंगाली, मराठी, गुजराती, तमिळ, तेलुगू इत्यादी भाषांचे साहित्य अधिक असते.

गेल्या पधरा वर्षात ज्या प्रमाणात हिंदी ग्रंथ-संख्येत भर पडली तेच प्रमाण पुढील पंधरा वर्षात राहीलच असे सांगवत नाही. कारण उघड आहे. हिंदी विरोधाला उघड उघड चालना मिळाली. राज्यांनी आपल्या कारभारासाठी राज्यभाषा वा इंग्रजी ही माध्यमे स्वीकारली. राज्यभाषांतूनही पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या परीक्षा घेतल्या जाव्या या विचाराला तत्त्वतः प्राधान्य मिळत चालले. विश्वविद्यालयातून राज्यभाषांना आणि इंग्रजीलाच प्राधान्य देण्याचे प्रयत्न सुरू झाले. आज ना उद्या हिंदी ही राष्ट्रभाषा होणार या कल्पनेतून बिगर हिंदी प्रांतातूनही हिंदी पुस्तकांची निपज होत असे तिला नाइलाजास्तव आळा बसण्याची शक्यता निर्माण झाली आहे.

हिंदी ही राज्यभाषा असणाऱ्या बिहार-राजस्थान इ. राज्यांतूनही एक नवी प्रवृत्ती उदयास येत आहे. याचा स्पष्ट प्रत्यय 'गंगा भैय्या तोहे पियरी चढैबो' 'सैय्या से भय्ये मिलनवां' या सारख्या प्रादेशिक हिंदीतून निघणाऱ्या बोलपटांकडे पाहिल्यास लक्षात येण्यासारखा आहे. कारण ज्या भाषिक अस्मितेच्या आधारावर बंगाली, मराठी, गुजराती, तमिळ, तेलुगू भाषिकांची आगेकूच चालू आहे त्याच आधारे मैथिली-गढवाली-राजस्थानी-व्रज-भोजपुरी बोलींतील पुस्तके हळूहळू प्रसिद्ध होऊ लागली आहेत. 'स्थानिक भाषेतूनच सारे व्यवहार करणे अधिक श्रेयस्कर' हा सुरवातीला प्रगत म्हणून पुढे आलेला विचार आता रूढ झाला आहे. शिवाय केवळ सरकारी आर्थिक मदतीने भराभर प्रसिद्ध केले गेलेले हिन्दी अनुवाद लक्षात येण्यास हिंदी मातृभाषिकांनाही पुनश्च इंग्रजीचा आश्रय करावा लागत आहे. पारिभाषिक शब्दांचे वेगवेगळया खात्यांतून आणि राज्यांतून प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांतून सापडणारे स्वैर अनुवाद थैमान घालीत आहेत. जिथे जिथे साधारणपणें डॉ. रघुवीरांचे कोश आधारभूत मानून हे अनुवाद प्रसिद्ध झाले त्यांची स्थिती सर्वात अनुकम्पनीय!

हिन्दीवाद्यातही संस्कृतनिष्ठ की लोकनिष्ठ असे निकरावर पोचणारे मतभेद आहेत. संस्कृतोद्भव शब्द वापरून हिंदीचा वापर केला जावा की लोका-भिमुख राहून प्रचलित असणाऱ्या इंग्रजी-पर्शियन शब्दांचाही वापर करून भाषा समृद्ध करावी हे दोन विचार एकदा मोठ्या भयानक स्थितीतून गेले आहेत. अधूनमधून त्यांचा प्रादुर्भाव होतोच. गोविंदशेठ सारख्या ऐकांतिक हिंदीवाद्यांबद्दल हिंदी भाषिकांतही मोठें प्रेम नाही. समाजवादी पक्ष तर त्याच जुन्या इंग्रज=इंग्रजी भाषा या विरोधाचे राजकीय भांडवल करताना दिसतो. हिंदीची अस्मिता आज मोठ्या



अनुक्रमणिका

संकटात सांपडली आहे. राजकीय पक्षांनी 'राष्ट्र' भाषेचे वेड बाजूला सारले तर हिन्दीची स्थिती, परिस्थिती अन् जनस्थिती मोठ्या पेचांत आहे हेच खरे !

## दुसरी एक अस्मिता

राष्ट्रभाषा कोणती असावी याचा विचारसंघर्ष चालू असता संस्कृतज्ञांची अस्मिता एकाएकी जागृत होते. "संस्कृत हे एके वेळी महाराष्ट्राचे भूषण होते. आज तो दागिना नाहीसा झाला आहे. आम्ही कंगाल बनलो आहोत. आमची मने आणि बुद्धी ओकीबोकी झाली आहेत. संस्कृत ही आमची अव्वलची राष्ट्रभाषा तिने या बहुभाषी राष्ट्राला एक केले. जीवनदृष्टी दिली. सौंदर्यदृष्टी दिली. तत्त्वज्ञानाची बैठक दिली." संस्कृत हीच भारताची राष्ट्रभाषा होण्यास सर्वच तऱ्हेने योग्य आहे याचा आवाज सामान्य संस्कृत साहित्य संमेलनांपासून लोकसभेतील वादविवादापर्यंत जाऊन भिडला. कलकत्ता येथे भरलेल्या अखिल भारतीय संस्कृत राष्ट्रभाषा संमेलनाने खालील ठराव पास केला.

" भारतराष्ट्रस्य प्रधानराष्ट्रभाषारूपेण हिन्दीभाषाया परिग्रहणस्य घोषणतः हिंसाऽऽचारे विद्वेषे च प्रादुर्भूते अ. भा. संस्कृतराष्ट्रभाषासंम्मेलनस्यास्याः सभाया अभिमतं यत्

"यतः भारतस्यैक्य, मखण्डत्वं, समैक्यत्वं च संस्कृतभाषया एव रक्षितानि भवेयुः ।

यतः स्मरणातीतकालात् संस्कृतभाषैव सर्वभारतीयभाषारूपेण प्रचलिता वर्तते आन्तर्राष्ट्रियस्वीकृतिं चेयं लब्धवती

यतश्चेयं प्रायेण सर्वासामेव प्रादेशिकभाषाणां जननीभूता यस्मात्कारणादेवेयं भारतसंविधानस्याष्टमानुसूच्यामन्तर्भूता ।

अतः सा संस्कृतभाषा भारतराष्ट्रस्य राजभाषापदे स्थापिता भवतु"—

लोकसभेतील वादविवादात भाग घेताना सर सी. व्ही. रामन् यांनी हिंदीऐवजी 'संस्कृत' च राष्ट्रभाषा होण्यास लायक आणि सर्वसंमत होणारी भारतीय भाषा आहे असा उद्‌घोष केला. स्वमतपरिपुष्टयर्थ त्यांनी 'हिब्रू' भाषेला १९४८ साली स्वतंत्र झालेल्या इस्रायलने राष्ट्रभाषेचा दर्जा देऊन तिचे पुनरुज्जीवन कसे केले याचा समर्पक दाखलाही दिला. हिंदी ऐवजी संस्कृतचा पुरस्कार करणारी मंडळी बहुतेक साऱ्याच प्रांतात आढळतील. हीही एक अशीच अस्मिता आहे हे या संबंधात लक्षात घेण्यासारखे आहे.

मद्रासमध्ये हिंदी विरोधाने बेभान होऊन अंगावर रॉकेल ओतून घेऊन जाळून घेण्याचे प्रयत्न झाले आणि यापूर्वी ब्राह्मण आणि आर्यांची संस्कृतभाषा यांजविरोधी चळवळ करणाऱ्या डी एम्‌केने (द्रविड-मुन्नेत्रकझगम्) तमिळनाडमधील कित्येक ब्राह्मणांना देशोधडीला लावले हा इतिहास अजून विस्मृत झाला नसेलच. एस्. एस्. सी मधून संस्कृतची हकालपटी करून जनताजनार्दनाला संतुष्ट करण्यात अहमहमिका मिळविणाऱ्यांना संस्कृत ही राष्ट्रभाषा ठरविली गेली तर काय समाधान वाटेल ?

## त्रिभाषा कि द्विभाषा?

भाषिक अस्मितेच्या या झगझगाटचांत भाषांचा उपयुक्ततेच्या दृष्टीने विचारच होऊ शकला नाही हे एक दुर्दैव समजले पाहिजे. हिंदुस्थानची स्वतःची अशी एक भाषा हवी या राष्ट्रवादी विचारातून अधिक लोक ज्या भाषेतून व्यवहार करतात ती हिंदुस्थानची भाषा म्हणून हिंदीने बहुमताच्या जोरावर आपला आवाज उठविला. आणि आता बहुमताच्या जोरावर अल्पमतांच्या लोकांवर अन्याय होऊ नये हा विचार प्रभावी होऊ पाहात आहे. तदनुसंधानानेच प्रांतिक भाषा आणि आंतरराष्ट्रीय भाषा म्हणून इंग्रजी या दोन भाषांचेच वर्चस्व प्रत्येक राज्यातून होऊ पाहात आहे. हिंदी ही चौदा भाषांपैकी एक असताना इतरांपेक्षा तिला अकारण महत्त्व देण्याचा विचार इतर भाषाभगिनींच्या अस्मितेला बाधा आणतो. प्रत्येक राज्यांतील अंतर्गत व्यवहार लोकाभिमुख दृष्टीने करावयाचे तर राज्यभाषेतूनच करणे अधिक उपयुक्त आणि इतर व्यवहार सध्या सर्वसंमत अशा इंग्रजी भाषेतूनच करणे युक्ततर होय हा विचार लक्षात घेतला तर गेल्या पंधरा वर्षात विद्यार्थ्यांना बळजबरीने ज्या तीन क्वचित चार भाषांचा अभ्यास अनिवार्यतेने करावयाला लावला त्याचा फोलपणा लक्षात येऊ लागतो.



अनुक्रमणिका

भाषेच्या पदवीधरांनाच फक्त तिसरी भाषा अनिवार्य व्हावी आणि तीही एक क्लासिकल्. इंग्रजी घेऊन पदवीधर होणाऱ्यांना ग्रीक वा लॅटिन, उर्दू घेऊन पदवीधर होणाऱ्यांना पर्शियन् वा अरॅबिक्, आणि इतर कोणत्याही भारतीय भाषाभगिनींतील भाषा घेऊन पदवीधर होणाऱ्यांना संस्कृत अनिवार्य ठेवणेच अधिक उपयुक्त होणारे आहे. सध्या या भाषिक अस्मितेच्या गलबलाटात एस्. एस्. सी. चा टिळा लावू इच्छिणाऱ्या विद्यार्थ्याला किती भाषांच्या कचाट्यातून जावे लागते आणि एक ना धड भाराभर चिंध्याच कशा पदरात पडतात याचे सुंदर चित्रण शिक्षणशास्त्रज्ञांच्या तोंडून ऐकावयास मिळते. बहुभाषिक रशियाने याच पद्धतीने आपली भाषिक समस्या सोडविल्याचे रशियन वकिलाने जाहीर केले. मातृभाषा आणि इंग्रजी या दोन भाषांनीच साऱ्या समस्या सुटणाऱ्या असता अकारण इतर भाषांचे जोखड विद्यार्थ्यांवर का लादावे ?

इतर प्रांतात वास्तव्य करावयाचे असल्यास किंवा इतर भाषाभगिनींच्या साहित्याबद्दल अतीव आदर असल्यास त्या भाषांचे अध्ययन करण्यास कुणीच [illegible] केलेला नाही. तो ज्याला खुषीचा कारभार. ज्या जरुरीतून लोक जर्मनी, फ्रेंच, जपानी इत्यादि भाषांचा अभ्यास करतात त्या व तसल्याच आवश्यकतेपायी इतर भारतीय भाषाभगिनींचा अभ्यास होईल. अनिवार्य म्हणून नव्हे.

दुर्दैवाने भाषिक प्रश्न राजकारणाच्या स्वार्थी ध्वजाखाली सोवळेपणाने वावरायला लागल्यापासून त्यातील युक्तोपयुक्ततेच्या प्रश्नाला अजिवात कलाटणीच मिळालेली दिसत आहे. विचारी माणसे आपले प्रांजल मत व्यक्त करण्यास धजावत नाहीत. कारण अशा प्रांजल मतामागेही लोक राजकारणाचा वास दडलेला आहे असेच समजतात.

## नवा विचार

साऱ्याच भारतीय भाषांची समृद्धी झाली पाहिजे, जोपासना झाली पाहिजे आणि त्यांच्यामध्ये परस्पर सामंजस्यही नांदले पाहिजे या विचाराला सध्याच्या भाषिक समस्यांच्या कोलाहल कालात बरीच चालना मिळालेली दिसते. प्रत्येक भाषेतील गुणवैशिष्ट्याची माहिती इतर भाषिकांना असली पाहिजे. अकारण किंवा जुन्या हेव्यादेव्यासाठी भिन्न भिन्न भाषिकात वैतुष्ट्य यावे हे प्रगत संस्कृतीचे लक्षण नव्हे, याची जाणीवही बहुतेक लोकांतून आढळते हे एक सुलक्षणच समजले पाहिजे. अधून मधून भाषासमस्येचे तारू संघर्षाच्या वावटळीत सापडते हे तर खरेच परंतु तो संघर्ष फार काळ टिकाव धरून राहू शकत नाही. हरिभाऊंच्या शताब्दिसोहळयाच्या निमित्ताने दिल्ली येथे महाराष्ट्र केन्द्राने घडवून आणलेला भारतीय साहित्यिकांचा मेळावा हा समयसूचक ठरावा. डॉ. सुनितीकुमार चटर्जी यांच्या दिग्दर्शनाखाली स्थापन झालेली आणि महाराष्ट्र सरकारने तत्क्षणी आर्थिक हातभार लावून गौरवलेली कलकत्ता येथील आशुतोष भारतीय भाषा विद्याभवन ( Asutosh Institute of Indian Languages ) ही नुकतीच स्थापन झालेली भारतीय भाषांचे अध्ययन अध्यापन- संशोधन संस्था हे या प्रबोधनाचे आणखी एक ताजे उदाहरण मानावयास हवे. विविध भाषांचे साहित्यिक स्पंदन कसे एकरूप -एकसंध आहे याचा पडताळा पाहाण्यासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती- मंडळानेही या बाबतीत उत्साह दाखवावयास हवा. भारतीय भाषांचा आणि साहित्याचा तौलनिक अभ्यास झाल्याशिवाय या भाषिक अस्मितेच्या संघर्षातून बाहेर पडण्यास दुसरा कोणताही प्रबल उपाय सध्यातरी दृष्टीपथात येत नाही.

---











अनुक्रमणिका

## वाचकांचा पत्रव्यवहार--

श्रीयुत संपादक, 'नवभारत', यास
सप्रेम नमस्कार विनंती विशेष,

एप्रिल १९६५ च्या नवभारत मासिकाच्या अंकात प्रा. सदाशीव आठवले यांचा "भारताच्या भाषिक प्रश्नांबाबतची एक अराष्ट्रीय भूमिका" हा लेख पाहिला. प्रा. आठवले यांच्या प्रतिपादनाशी मी सहमत आहे. फक्त काही मुद्यांचा अधिक विचार व्हावा म्हणून हे टिपण पाठवीत आहे.

प्राध्यापक आठवले म्हणतात त्यानुसार "भारतात भाषाविषयक धोरण राज्यभाषा आणि इंग्रजी या दोन आणि दोनच भाषांच्या अनुरोधाने आखणे हा एकच मार्ग सोयीचा आणि न्यायाचा दिसतो." त्यांची ही सूचना मान्य झाली तर आपल्या विद्यापीठातील कला विभागाच्या अभ्यासक्रमासंबंधी एक महत्त्वाचा निष्कर्ष निघेल. आज कला विभागात पहिल्या दोन वर्षांच्या विद्यार्थ्यांना चार भाषा शिकाव्या लागतात. नऊ पेपर्सपैकी ४ पेपर्स वेगवेगळ्या भाषांचे असल्यामुळे या विद्यार्थ्यांचा इतर विषयांचा अभ्यास असमाधानकारक राहिल्यास आश्चर्य वाटण्यासारखे नाही. भाषाविषयक अभ्यासक्रम तयार करताना त्याची उद्दिष्टे काय या प्रश्नाचे स्पष्ट उत्तर डोळ्यांसमोर नसल्यामुळे हे घडले असावे. उदाहरणार्थ; इंग्रजी, मातृभाषा, किंवा प्रादेशिक भाषा, हिंदी, आणि संस्कृत किंवा तत्सम जुनी भारतीय भाषा वा इंग्रजी सोडून कुठलीतरी आधुनिक युरोपीय भाषा, अशा चार भाषा जवळ जवळ एका पातळीवरून शिकविण्यात अभ्यासक्रम नेमणाऱ्यांच्या मनातील उद्दिष्टांसंबंधी असलेला गोंधळच दिसून येतो. हा गोंधळ दूर करण्याच्या दृष्टीने मी खालील सूचना, किमान महाराष्ट्रातील विद्यापीठांच्याकरिता करतो.

भाषेच्या अभ्यासाची दोन उद्दिष्टे असू शकतात. पहिले, भाषा ज्या संस्कृतीची वाहक असते त्या संस्कृतीच्या मूल्यांशी आणि परंपरांशी विद्यार्थ्याचा नीट परिचय व्हावा; आणि दुसरे, ज्ञानसाधनेकरिता आवश्यक साधन हस्तगत व्हावे. मातृभाषेच्या बाबतीत पहिले उद्दिष्ट, आणि इंग्रजीच्या बाबतीत दुसरे उद्दिष्ट लागू पडेल. संस्कृत किंवा हिंदी या भाषांचा अभ्यास तिसऱ्या एका उद्देशाने काही विद्यार्थी करतील, परतु ते स्वखुशीने, हे सगळे सांगावयास नको.

वर मांडलेली भूमिका मान्य झाली तर मातृभाषेचा अभ्यासक्रम आज आहे त्यापेक्षा किती तरी अधिक सखोल आणि व्यापक करावा लागेल. उदाहरणार्थ, मराठी मातृभाषा असलेल्या विद्यार्थ्यांना गडकऱ्यांची एकदोन नाटके वाचून परीक्षेत पास होऊ देता कामा नये. गडकऱ्यांची सर्व नाटके किंवा हरि नारायण आपटे यांच्या सर्व कादंबऱ्या तो विद्यापीठात येण्यापूर्वीच वाचून चुकलेला असतो. विद्यापीठीय अभ्यासक्रमाची अपेक्षा अशी असायला पाहिजे की या साहित्याकडे विद्यार्थी आपल्या समाजाच्या सांस्कृतिक परंपरेचे वाहक म्हणून चिकित्सक दृष्टीने पहायला शिकेल.

इंग्रजीच्या बाबतीत यापेक्षा वेगळा दृष्टीकोन असला पाहिजे. विद्यापीठीय शिक्षणाच्या पहिल्या दोन वर्षात इंग्रजी भाषा एक ज्ञान-भाषा म्हणूनच शिकविली गेली पाहिजे हे आता जवळ जवळ सर्वमान्य झाले आहे. त्या दृष्टीने पाहता या विषयाची पाठ्यपुस्तके केवळ साहित्यिक स्वरूपाची असणे योग्य नाही. आज ही पुस्तके इंग्रजीत ज्याला belles-lettres म्हणतात त्या प्रकारची असतात. एखादेवेळी बर्ट्रेन्ड रसेल किंवा तत्सम विचारवंताचे पुस्तक किंवा निबंध अभ्यासक्रमात समाविष्ट केले जातात. परंतु सामान्यतः हा अभ्यासक्रम कवींच्या कविता, शेक्सपिअरचे एखादे नाटक आणि भारतीय-इंग्रजीत लिहिलेले काही लिखाण यांचा तयार झालेला असतो. याऐवजी इंग्रजीच्या अभ्यासक्रमात जर उत्कृष्ट शैलीत लिहिलेल्या समाजशास्त्रावरील आणि भौतिकशास्त्रावरील लिखाणाचा अंतर्भाव केला तर विद्यार्थ्यांच्या बौद्धिक विकासाच्या दृष्टीने तो अधिक उपयुक्त ठरेल. एवढेच नव्हे तर इंग्रजीच्या अभ्यासात विद्यार्थ्यांना अधिक गोडी वाटेल.

वर केलेल्या सूचना जर मान्य झाल्या तर आज भाषाविषयक चार पेपर्स जाऊन फक्त दोनच पेपर्स उरतील. आजच्या दोन पेपर्सच्या ऐवजी इतिहास,



अनुक्रमणिका







अर्थशास्त्र, तर्कशास्त्र, समाजशास्त्र इत्यादी विषयांचा अभ्यास अधिक समाधानकारक रीतीने करण्यास विद्यार्थ्यांना वेळ उपलब्ध होईल.

विज्ञानाच्या अभ्यासक्रमाबद्दल सुद्धा अशीच सूचना करता येईल. परंतु येथे थोडा वेगळा विचार करावा लागेल. आज विज्ञानाच्या अभ्यासक्रमात इंग्रजी, प्रादेशिक भाषा आणि हिंदी या तीन भाषांचे पेपर्स असतात. या तीनही भाषांबद्दल बहुसंख्य विद्यार्थी आणि शिक्षणसंस्था अक्षम्य अशी अनास्था दाखवीत असतात. परिणामी, विज्ञानाच्या शाखांच्या पहिल्या दोन वर्षांच्या परीक्षात उघडउघड शैक्षणिक अप्रामाणिकता रूढ होत आहे. ही परिस्थिती लक्षात घेत असताना आणखीही एक दोष आपल्या निदर्शनास येतो. विज्ञानाचे शिक्षक आणि विद्यापीठीय क्षेत्रातील बरेचसे शिक्षणतज्ञ यांचा असा समज दिसतो की, विज्ञानाच्या विद्यार्थ्यांनी साहित्य किंवा भाषा यांकडे दुर्लक्ष केले तरी हरकत नाही. मला वाटते की, विद्यार्थ्यांच्या सर्वांगीण विकासाकरिताच नव्हे तर त्यांच्या विज्ञानाच्या विशिष्ट अभ्यासाच्या दृष्टीनेसुद्धा ही वृत्ती घातुक आहे. भाषेवरील प्रभुत्व आणि स्पष्ट व मौलिक विचार करण्याची ताकद या दोन्ही गोष्टींमध्ये फार जवळचा संबंध आहे. भाषेचा विकास पुरेसा झाला नसेल तर ज्ञानाचा विकासही समाधानकारकरीत्या होऊ शकणार नाही. गूढवाद्यांची समाधी सोडली तर भाषा ही सर्व क्षेत्रात आवश्यक असलेली गोष्ट आहे. शिक्षणशास्त्रात हा सिद्धान्त आता जवळ जवळ सर्वमान्य झाला आहे.

म्हणून विज्ञानाचे शिक्षण खरोखरच यशस्वी व्हावयाचे असेल तर विचारांच्या निर्मिती आणि अभिव्यक्तिसाठी विज्ञानाच्या विद्यार्थ्यांना भाषेचे अधिक चांगले शिक्षण देण्याची आवश्यकता आहे. तपशीलाचा प्रश्न सोडून दिला तर या विधानाचा अर्थ असा की विद्यापीठीय पातळीवर कला आणि विज्ञान विभागाच्या पहिल्या दोन वर्षांच्या काळात भाषाशिक्षणाचे स्वरूप एकसारखेच असले पाहिजे.

प्रा. आठवले यांनी केलेल्या भाषाविषयक भूमिकेचा विद्यापीठीय शिक्षणक्षेत्रात काय परिणाम होईल याचे थोडक्यात विवेचन वर केले आहे. त्यांनी उपस्थित केलेल्या दुसऱ्या दोन मुद्यांवर लिहून हे टिपण संपवतो.

केन्द्रीय आणि आंतरराज्य पातळीवर हिंदी ही कारभाराची भाषा व्हावी या सूचनेस विरोध करताना प्रा. आठवले यांनी हिंदीवाल्यांचा आग्रह संख्याप्रमाणाच्या दृष्टीनेही किती अवास्तव आहे हे सांगितले आहे. थोडे पुढे जाऊन मी असे म्हणेन की, हिंदीवाल्यांचा दावा संख्येच्या दृष्टीनेही फसवा आहे. देशातील ४२ टक्के लोकांना हिंदी समजते हे सत्य. परंतु खरे पाहिले तर हे सत्य अप्रस्तुत आहे. कारण असे की, केन्द्रीय आणि आंतरराज्य कारभार, उच्च शिक्षणाच्या आणि तत्सम संस्था, इत्यादींच्या व्यवहाराशी सर्वमान्य नागरिकांचा प्रत्यक्ष संबंध येत नाही. संबंध येतो तो देशातील २ ते ५ टक्के लोकांचा. हे लोक प्रशासन किंवा विद्यापीठे, राष्ट्रव्यापी प्रसार असलेली वर्तमानपत्रे आणि नियतकालिके, संशोधनसंस्था इत्यादी क्षेत्रात कार्य करीत असतात. म्हणून भारताच्या भाषिक प्रश्नाचा येथे अभिप्रेत असलेल्या संदर्भात प्रश्न आहे तो या उच्च शिक्षित वर्गाच्या कार्यक्षमतेचा, सर्वसामान्य नागरिकांचा नव्हे. या दृष्टीने पाहिले तर हिंदी ४२ टक्क्यांऐवजी १०० टक्के लोकांना समजत असली तरी वर उल्लेख केलेल्या महत्त्वाच्या कामांकरिता ती अयोग्य ठरली असती. म्हणून भाषेचा प्रश्न सोडविताना जशी टोकळेबाज राष्ट्रीयवादाची भूमिका त्याज्य समजली पाहिजे तशीच टक्केवारीची भूमिकाही अप्रस्तुत समजली पाहिजे.

राज्यपातळीवर प्रादेशिक भाषा आणि राष्ट्रीयपातळीवर हिंदी अशी भूमिका घेणारे लोक असाही तर्क करतात की, हिंदीच्या ऐवजी इंग्रजीस राष्ट्रभाषेचे स्थान दिले तर या देशात एक नवीन राज्यकर्तावर्ग निर्माण होईल. किंवहुना, आजही तो वर्ग आहेच आणि आजची परिस्थिती कायमची होईल. हा तर्क सुद्धा गैरसमजावर आधारलेला आहे. इंग्रजी भाषा राष्ट्रीय पातळीवरच्या व्यवहाराची माध्यम म्हणून कायमची राहिली पाहिजे असे सांगताना हेही अभिप्रेत आहे की, इंग्रजीचे शिक्षण राष्ट्रव्यापी तर होईलच, परंतु त्याचबरोबर बहुसंख्य समाजांतल्या



अनुक्रमणिका

मुलांना तिच्या अभ्यासासाठी खास सवलती दिल्या पाहिजेत. ज्याअर्थी, इंग्रजी या देशात अनेक वर्षे राहणार आहे त्याअर्थी, जर तिचे शिक्षण आर्थिक किंवा सांस्कृतिक दृष्ट्या मागासलेल्या वर्गातील मुलांना सहजपणे मिळू शकत नसेल तर त्या वर्गातून या देशाचे उच्चतम नेतृत्व निर्माण होऊ शकणार नाही. श्रीमंत आणि पांढरपेशा वर्गातील मुले, इंग्रजीचे शिक्षणसंस्थांमधून उच्चाटण झाले तरी देखील, तिचा अभ्यास खाजगीरीत्या करू शकतील. अडचण होईल ती बहुजन समाजातून येणाऱ्या विद्यार्थ्यांची. १९५१ मध्ये मुंबई राज्यात ज्यावेळी शाळेतील इंग्रजी भाषेच्या शिक्षणाची मदत ७ वरून ४ वर्षे करण्यात आली त्यावेळी बहुजन समाजाच्या एका काँग्रेसपक्षीय नेत्याने याच कारणास्तव सरकारी धोरणाचा विरोध केला होता. मला वाटते की, यात एक मोठे तथ्य आहे. इंग्रजी भाषेचा विरोध करणाऱ्यांनी हे लक्षात ठेवले पाहिजे की त्यांचा उद्देश कितीही चांगला असला तरी त्यांचे प्रयत्न जर सफल झाले तर या देशात एक नवीन जाति-व्यवस्था निर्माण होईल, व त्याचे फार दूरगामी परिणाम होतील. असो.

—अ. भि. शहा.

( २ )

## राष्ट्रभाषा 'हिंदी'च का ?

श्री. सदाशिव आठवले यांनी नवभारत एप्रिल १९६५ च्या अंकात भारताच्या भाषिक प्रश्नाबाबत थोडक्यात, फार विचारपूर्वक चर्चा केली आहे. त्यात त्यांनी 'इंग्रजी ही ज्ञानभाषा व घटक राज्यांच्या जन्मभाषा या त्या त्या राज्याच्या राज्यभाषा झाल्या पाहिजेत', हे जे मत प्रदर्शित केले आहे ते सर्वमान्य झालेलेच आहे. पण, 'नावडतीचे मीठ अळणी' या प्रमाणे शेवटी त्यांनी 'हिंदी भाषेसंबंधी जे मत प्रदर्शित केले आहे, ते मान्य होण्यासारखे नाही. 'राष्ट्रीयत्व उत्पन्न होण्यास देशात एकच भाषा असली पाहिजे' हे जरी खरे नसले तरी "एखाद्या भाषेसंबंधीची भावना तीव्र असते, आणि तिचीच राष्ट्रीयत्वाच्या भावनेत परिणती झाली तर त्या भाषेने , दुधात साखर पडल्याप्रमाणे राष्ट्रियत्व जास्त तेजस्वी होऊ शकते हे ते मान्य करतात. पण म्हणतात "'हिंदी' बद्दल देशातील फार मोठ्या भागात आत्मीयता नाही" हे त्यांचे विधान चिंत्य आहे. इ. स. १९६१ मध्ये जे जनसंख्या परिगणन झाले, त्यात चव्वेचाळिस कोटी एकंदर जनसंख्येत हिंदी जन्मभाषा असणारांची संख्या जवळ जवळ चौदा कोटी आहे. मी स्वतः दिल्लीपासून रायचूर गुंटकलपर्यंत, व 'द्वारके'पासून जगन्नाथपुरीपर्यंत प्रवास केला आहे, त्यातील बहुतेक शहरातून सभागृहात, देवळात, बाजारात, खाणावळीत व रेल्वेच्या थर्ड क्लासच्या डब्यात शेकडा पन्नास टक्के लोकानां 'हिंदी' अथवा उर्दू' बोललेले समजते. व ते ही भाषा बोलू शकतात. म्हणजे भारतातील तीन चतुर्थांश लोकसंख्येत शेकडा पन्नास लोक 'हिंदी' बोलू शकतात, व हिंदी समजू शकतात. 'महाराष्ट्र' व गुजराथ' ही अगदीच 'अहिंदी' राज्ये आहेत असे म्हणता येणार नाही.

तेच इंग्रजी समजणारे व बोलणारे शेकडा दोनसुद्धा आढळणार नाहीत. आर्य समाजाने आपल्या पंथाचा प्रचार सर्व हिंदुस्थानात एका हिंदी भाषेच्या द्वारे केला ! हिंदी कल्याण मासिकाचा खप जितका आहे तितका इतर कोणत्याही चौदा भाषेतील मासिकाचा नाही. भारतातच नव्हे तर 'अमेरिका' 'इंग्लंड', रशिया' येथील रेडियो स्टेशनद्वारा बातम्यांचा व विचारांचा प्रसार उर्दूतूनच होतो. 'चीन'चा रेडियो तर शुद्ध हिंदीतून प्रचार करतो. कारण एवढेच की भारतातील चौदा भाषांपैकी 'हिंदी' अथवा 'उर्दू' हीच बहुजनाना समजू शकते. 'उर्दू' भाषा केवळ मुसलमानांची नाही. तर नर्मदेच्या वरील देशात सर्वत्र हिंदू व मुसलमान 'उर्दू' भाषाच वापरीत असतात. हिंदी ही मुसलमानांच्या 'उर्दू'पासून आली. म्हणून त्याज्य असे म्हणता येणार नाही.

घटक राज्यांची राज्यभाषा त्यांची जन्मभाषाच झाली पाहिजे, तर केन्द्राच्या बहुसंख्य जनतेची जन्मभाषा जी 'हिंदी' तीच केन्द्राची राज्यकारभाराची भाषा झाली पाहिजे हे ओघानेच आले. उच्च शिक्षण इंग्रजी भाषेच्याच द्वारे झाले पाहिजे.

पण ही शेकडा दहा बुद्धिमंतांची गोष्ट झाली. देशात शेकडा ९० जे सामान्य बुद्धीचे लोक त्यांच्यात ज्ञानाचा प्रसार होण्यास जन्मभाषेबरोबरच हिंदीच्याद्वारे प्रचारकार्य चांगले होऊ शकते. ३५ वर्षांपूर्वी, महात्मा गांधी, सरदार पटेल, सुभाषचंद्र बोस, व राजगोपालाचारी 'यांनी ' हिंदी ' हीच बहुसंख्य लोकांना समजणारी भाषा होऊ शकेल, हे जाणले. हा जो निर्णय घेण्यात आला, ह्या नेत्यांची जन्मभाषा 'हिंदी' होती म्हणून हा निर्णय घेण्यात आला असे कदापि म्हणता येणार नाही.

महाराष्ट्रास हिंदीची भीती वाटण्याचे काहीच कारण नाही. 'नामदेव' व 'एकनाथ' या आमच्या संतांनी तिचा मागेच स्वीकार केला आहे. 'हिंदी' भाषेत वक्तृत्व जितके प्रभावी होऊ शकते, तितके इंग्रजीतसुद्धा होऊ शकत नाही. गायनकलेत हिंदीच आघाडीवर आहे. सैन्यासाठी सुभाषचंद्रांनी बंगालीची निवड केली नाही. हिंदी भाषेचीच केली, व तीच अद्याप कायम आहे. नुकताच मद्रास प्रांतात जो हिंदीविरोधी आक्रस्ताळेपणा करण्यात आला, त्यास केवळ हिंदी विरोध कारण नव्हता. ' दक्षिणेवर 'उत्तर हिंदुस्थाना' चे श्री 'रामचंद्र' पासून लालबहादुरशास्त्र्यांपर्यंत जे आक्रमण होत आहे ही जी त्यांची भ्रामक न्यूनगंड-वृत्ती, जी मुद्दाम उत्पन्न केली गेली आहे, ती ह्या विरोधास कारणीभूत झाली.

**–वा. दा. गाडगीळ**

( ३ )

**श्री. आठवल्यांची अयोग्य भूमिका:–**

श्री. सदाशिव आठवल्यांना (एप्रिल १९६५ च्या नवभारतात) 'भारतातील भाषा विषयक धोरण राज्यभाषा आणि इंग्रजी ह्या दोन आणि दोनच भाषांच्या अनुरोधाने आखणे हा एकच मार्ग सोयीचा आणि न्यायाचा दिसतो'. व हा 'सोयीचा आणि न्यायाचा मार्ग' 'भारताच्या भाषिक प्रश्नाबाबतच्या एका अ-राष्ट्रीय भूमिकेतून' निघालेला व 'भाषेच्या प्रश्नाकडे राष्ट्रीयत्वाच्या दृष्टीकोणाने पाहण्याचे कारण असतेच असे नाही' अशा समजातून चालणारा आहे. श्री. आठवल्यांचा मार्ग त्यांच्या समजाचा मार्ग आहे. शिवाय तो अ-राष्ट्रीय असल्यामुळे राष्ट्रोपयोगी असण्याची जरूरीही त्यांना वाटत नसावी. पण, भाषिक प्रश्न हा भारताचा असल्यामुळे तो भारत-राष्ट्राचा आहे, हे दुर्लक्षून याबाबत 'मूलगामी विचार' होऊ शकेल असे मानणे ही निव्वळ कल्पना वाटते आणि अशा कल्पनेचा आधार श्री. आठवल्यांनी त्यांच्या लेखात घेतला हे अगदी स्पष्ट दिसते. म्हणून श्री. आठवल्यांची 'भारताच्या भाषिक प्रश्नाबाबतची एक अ-राष्ट्रीय भूमिका' ही एक काल्पनिक भूमिका आहे हे मी श्री. आठवल्यांची क्षमा मागून स्पष्टपणे सांगू इच्छितो.

भाषिक प्रश्नांबाबतची ' अ-राष्ट्रीय भूमिका सांगताना इंग्रजीचे समर्थन जोरदारपणे करणे श्री. आठवल्यांना आवश्यक वाटले आहे, एवढेच नव्हे तर इंग्रजीचे समर्थन करताना इंग्रजी सभ्यतेला उचलून धरले आहे. 'आपले सर्व बाबतीत आधुनिकीकरण झाले ते इंग्रजीमुळे' हे ठासून सांगताना भारतीय प्राचीन सभ्यतेविषयी अकारण निषेधात्मक अप्रीती दाखविली आहे. 'इंग्रजी हाकलून करायचे काय ? पुन्हा वेदमंत्रांचा घोष करायचा ? पुन्हा जातिसंस्था आणि अस्पृश्यता आणायची ? मुलींचे शिक्षण बंद करून पुन्हा सतीची चाल सुरू करायची ? बैलगाडीचा जीर्णोद्धार करावयाचा ?' असे अप्रस्तुत व असंबद्ध ( हे प्रश्न असंबद्ध नाहीत' असे श्री. आठवले म्हणतात ते कशाकरिता हे कळू शकले नाही.) प्रश्न उपस्थित करून वैचारिक भूमिकेपासून ढळत मानसिक-क्षोभाकडे वळल्याचा परिचयही श्री. आठवल्यांनी त्यांच्या लेखात दिला आहे. पण, भारतीय प्राचीन सभ्यतेचा विरोध व इंग्रजीमुळे आलेल्या आधुनिक सभ्यतेचा पुरस्कार भाषिक प्रश्नाच्या संबंधाने उपयुक्त कसे व का हे मात्र श्री. आठवल्यांनी सबंध लेखात कुठेच सांगितलेले नाही. पण, यामुळे श्री. आठवल्यांची अ-राष्ट्रीय भूमिका ही (कळत न कळत) इंग्रजीच्या समर्थनाची भूमिका ठरली आहे. म्हणून इंग्रजीची आवश्यकता इंग्रजीचे समर्थन केल्याने पटणारी आहे असा काहीसा (गैर) समज श्री. आठवल्यांचा झालेला दिसतो. पण, श्री. आठवल्यांचा समज व त्यांना दिसणारा 'मार्ग' त्यांच्या भूमिकेशी निगडीत असल्यामुळे त्यांचा समज चुकीचा की बरोबर किंवा मार्ग' चुकीचा की बरोबर हे ठरविणे योग्य नव्हे ! पण भूमिका चुकीची की बरोबर यावर विचार होऊ शकतो.










श्री. आठवल्यांनी भारताच्या भाषिक प्रश्नांकडे अ-राष्ट्रीय भूमिकेतून पाहणे योग्य नव्हे. कारण, भारताचा भाषिक प्रश्न हा राष्ट्रीय प्रश्नच आहे. राष्ट्राला सोयीचे आणि उपयुक्त जे असेल तेच घडावे असाच उपाय आजच्या भाषिक प्रश्नाच्या दृष्टीने शोधावयाचा आहे. आणि हा उपाय राष्ट्रीय ऐक्य-संवर्धक, तसाच तो लोकशाहीमूल्यांशी प्रामाणिक असावा याची खरी निकड आहे. कारण, भारताचा भाषिकवाद हा निव्वळ भाषिकवाद नसून प्रादेशिक व द्विराष्ट्रवादाला खतपाणी पुरविणारा वाद आहे. म्हणून प्रादेशिक संस्कृती व वैशिष्ट्यांची योग्य जपणूक करीत राष्ट्रैक्याची भावना वाढावी हीच खरी भारताची गरज आहे. राष्ट्रैक्याची भूमिका ही काही राष्ट्रीयत्वाची भूमिका नव्हे. कारण, राष्ट्रैक्याची आवश्यकता लोकशाहीच्या वाढीकरता आहे. राष्ट्रीयत्वाला लोकशाही मान्यच असेल असे नाही. म्हणून राष्ट्रैक्य व राष्ट्रीयत्व यातला फरक नीट ध्यानात घेतला पाहिजे. राष्ट्रीयत्वात राष्ट्राभिमान आहे. राष्ट्रैक्यात लोकशाहीची आस्था आहे. राष्ट्राभिमान हिटलरच्या मार्गाने जाऊ शकेल. पण, राष्ट्रैक्याला लोकशाहीचा मार्गच अभिप्रेत राहील.

भारताच्या भाषिक प्रश्नाला जे वळण आले ते खरे पाहता गैरसमजामुळे आणि अनेक वर्षे दडून बसलेला प्रदेशाभिमान, भाषाभिमान व द्विराष्ट्रवाद संधी मिळताच वर फोफावून आल्यामुळे. पण, भाषिक वादाचे हे वळण विकृत मनोभूमिकेचे लक्षण आहे. म्हणून हे लक्षण जमेस धरून भाषिक प्रश्नांच्या दृष्टीने उपाय शोधणे योग्य नव्हे. ही लक्षणे नष्ट करणे भारताच्या लोकशाहीला हितावह आहे. विकृत मनोभूमिकेचे लक्षण दुर्लक्षून भाषिक वादाचा प्रश्न जर आम्ही नीट न्याहाळला ना तर भाषिकवादातून उद्वेग किंवा क्षोभ वाढविण्याचे कारण दिसणार नाही, असा तो सरळ प्रश्न वाटेल. पण, ही भूमिका स्वीकारण्याची मनोवृत्ती आज दिसत नाही, हेच खरे दुर्दैव आहे.

श्री. आठवल्यांनी त्यांची भूमिका बदलावी ही अिच्छा व प्रार्थना.

--बाबुराव चंदावार.

( ४ )

## योगशास्त्र हे प्रायोगिक शास्त्र आहे

डॉ. बा. दा. गाडगिळांनी सप्टेंबर १९६४ या अंकात अनामिकांच्या चिंतनिकेस अनुसरून लिहिलेला लेख वाचला. त्यातील दोन विधानांना श्री. निजसुरे, धुळे यांनी दिलेली उत्तरे वाचली त्यांच्या पत्राला अनुसरून डॉ. गाडगिळांची कैफीयतही पाहिली म्हणूनच त्यासंबंधी या लेखात चर्चा करतो.

डॉ. गाडगिळांना आत्मा, ब्रह्म इत्यादी मान्य नाही, त्याचप्रमाणे योगशास्त्र व सिद्धी हेही मान्य नाही. आसन व प्राणायाम ही दोन अंगेच ते मानतात. पुढील सहा अंगांचा त्यांचा अभ्यास, यत्न, श्रम वगैरे त्यांची किती तपश्चर्या आहे हे त्यांचे त्यानाच माहिती. कारण एखाद्या सुप्रतिष्ठित शास्त्राचा निषेध करावयाचा म्हणजे बरेच परिश्रम करून ते विफल झाल्यावरच ते शास्त्र एक थोतांड आहे असे म्हणणे सयुक्तिक ठरते.

रोगपरिहारपूर्वक आरोग्य देणारे जे ॲलोपाथी शास्त्र, त्याचप्रमाणे होमिओपाथी, कामोपाथी, निसर्गोपाथी, आयुर्वेद, शेवटी जुन्या आजीबाईचा बटवा हेही एक शास्त्र आहे. कोणतेही शास्त्र पूर्ण नाही. अंशत सर्वच शास्त्रे सत्य आहेत. हल्ली रोग्याची परीक्षा म्हणजे मल, मूत्र, रक्त, स्टीवन तपासणे. क्ष-किरणाने तपासणी करून फोटो घेणे, शिवाय रोग्याला प्रश्न विचारून व प्राथमिक तपासणीतच ५०।७५ रुपये हबकून त्यांला कासावीस करणे असा जमाना व तो आंगवळणी पडला आहे. पण पूर्वीचे वैद्य चेहरा व नाडी पाहून अचुक निदान करीत; औषधियोजना करीत व रोगी बरे होत असत. नाडीने काही कळत नाही. उगाच गप्पा आहेत असे म्हणणारे डॉक्टर आज पुष्कळ असले तरी तेही एक शास्त्र आहे येवढे मान्य करावे लागेल. पुणे सदाशिव पेठ सोट्या मारुतीजवळ श्री. आण्णासाहेब आपटे सराफांच्या घराच्या माडीवर मराठवाड्यातील एक वृद्ध वैद्य बसतात. त्यांच्याकडे शेकडो रोगी जातात. ते वृद्ध वैद्य नाडी व चेहरा पाहूनच बरोबर निदान करितात व ते रोग्यांना पटते. लिहिण्याचा उद्देश इतकाच की रोगपरिहाराचे जसे भिन्नभिन्न मार्ग आहेत त्याचप्रमाणे भवरोग नष्ट करण्याच्या मार्गामध्ये योगशास्त्र हे एक सुप्रतिष्ठितशास्त्र आहे.

## मानवी मनाचे सामर्थ्य

हे सामर्थ्य फार मोठे आहे. ते सामर्थ्य पराकोटीला नेण्याकरिता योगशास्त्र आहे. will power म्हणून सांप्रत त्या शास्त्राचे प्रयोग होत आहेत. चित्तवृत्तीच्या निरोधाने द्रष्टा स्व–स्वरूपातच अवस्थित होतो. चित्त, मन, बुद्धी इत्यादी सर्व अंतःकरणाच्याच वृत्ति–व्यापार आहेत. चित्ताचे स्पंदन म्हणजेच हे विज्ञान, प्रपंच, संसार होय. स्पंदनरहित चित्त म्हणजे चित्–आत्मा–ब्रह्म होय. जगच्चालक शक्तीशी तादात्म्य पावलेले मन महा-समर्थ असेत. ते त्या शक्तीप्रमाणे सर्वज्ञ सर्वशक्तिमान होते. या स्थितीला जाईपर्यंत मध्ये अनेक विघ्ने येतात. ती विघ्ने म्हणजे सिद्धी होत. योगशास्त्र हे केवळ सिद्धी करिताच शास्त्र नाही. सिद्धीसंबंधी सत्य थोडे व गप्पा फार हे आहेच. ते वर्ज्य करून शास्त्राचे प्रयोजन पाहिले पाहिजे. वेदान्त शास्त्राने आत्मसाक्षात्कारार्थ सर्व शास्त्राचा समन्वय केला आहे. चित्त शुद्ध्यर्थ मीमांसा-बुद्धि सूक्ष्म व तर्कशुद्ध होण्याकरिता न्याय, सृष्टिप्रक्रिये-करिता सांख्यशास्त्र व मनोनिग्रहार्थ योगशास्त्र अवश्य आहे. आत्मसाक्षात्कारार्थ निदिध्यास हे साधन आहे व त्यामध्येच मनोनिग्रहाचा–योगाचा अंतर्भाव होतो.

अथ 'योगानुशासने' असे भगवान् पतंजली म्हणतात. अनुशासनाचे अधिकारी आचार्य असतात ते स्वतःला शास्त्रप्रवर्तक समजतात व इतर शास्त्रकार त्यांना तो मान देतात. जो स्वतःला मनुष्य समजतो व ज्याला इतर माणसेही मनुष्य समजतात तो मनुष्य होय. जो स्वतःला ब्राह्मण समजतो व ज्याला इतर ब्राह्मणही ब्राह्मण समजतात, तो ब्राह्मण होय. अशा ब्राह्मणाला अब्राह्मण, अशा माणसाला मनुष्य नाही, असे समजणे जितके योग्य तितकेच सुप्रतिष्ठित झालेल्या योग-शास्त्राच्या एका अंगाबद्दल आक्षेप घेणे "अहो साहस-मेतेषाम्" इतक्या प्रस्तावानंतर मुख्य विषयाकडे वळतो.

## पातंजलयोग हे एक सुप्रतिष्ठित शास्त्र आहे

अनेक संशयाचा उच्छेद करून परोक्षार्थ दाखवून अपरोक्ष साक्षात्कार घडविणारे हे योगशास्त्र आहे. श्वेताश्वतराच्या दुसऱ्या अध्यायामध्ये या शास्त्राची प्रक्रिया विस्तृत आहे. कठोपनिषत् अ. २ वल्ली ६ मंत्र ११।१२ मध्ये 'स्थिर 'इंद्रियधारणे'चा उल्लेख आहे. व तिलाच 'तां योगमिति मन्यते' असे म्हटले आहे. स्मृतीमध्ये अनेक स्मृतिकारांच्या मागे योगी शब्द आहे उदा. "योगीश्वरं याज्ञवल्क्यम्" शंकराचार्यांचे आजेगुरू श्री गौडपाद यांनी मांडुक्यकारिका अ. ३ कारिका ३९ ते ४७ मनोनिग्रहार्थ योगाचा विचार केला आहे. लय, विक्षेप, कषाय व रसास्वाद अशा अवस्था आहेत पैकी कषायावस्थेमध्ये काही सिद्धी प्राप्त होतात असे पुढच्या अनेक ग्रंथकारांचे म्हणणे आहे. शंकराचार्यांचे गुरु गोविंद योगींद्र म्हणजे ते मोठे योगी होते, असे सूचित होते. योगतारावली हा त्यांचाच ग्रंथ आहे. श्री शंकराचार्यांनी योगबलाने परकाया-प्रवेश केला हे प्रसिद्ध आहे. ज्ञानेश्वराप्रमाणे एकनाथ व तुकारामांनीही योगानुभव सांगितले आहेत.

## वैदिक परंपरा व षट्शास्त्रे

सहा आस्तिक व सहा नास्तिक दर्शने (शास्त्रे) वैदिक परंपरेमध्ये मानली आहेत पातंजल योगशास्त्राचा आस्तिक दर्शनामध्ये अंतर्भाव आहे. भगवान पतंजली शेषाचे अवतार हे त्या शास्त्राचे प्रवर्तक होत. पातंजल योगाचे ४ पाद असून तिसऱ्या विभूतिपादामध्ये सिद्धीचा विषय आहे. चित्ताचा संयम कशाकशावर केला असता. कोणत्या सिद्धी प्राप्त होतात याचा तेथे विचार आहे. हा विषय काही पुस्तकी नाही तर गुरु संनिध राहून तो परंपरेनच निष्ठा व आदरानेच ग्रहण करावा लागतो. नाथ संप्रदायामध्ये ही विद्या होती. दत्त संप्रदायातही होती याचे अलीकडचे मोठे उदाहरण श्री. टेंबे महाराज तथा वासुदेवानंद सरस्वती हे होय. याच परंपरेतील श्री. गुळवणी पुण्यास आहेत. आळं-दीचे नृसिंह सरस्वती याच योगपरंपरेतील होते.

## इंग्रजाने लिहिलेले ग्रंथ पहा

सर जॉन वुराफ कलकत्ता हायकोर्टाचे न्यायमूर्ती यांचा या विषयावर ग्रंथ असावा. महर्षी आण्णासो पटवर्धन परंपरेतील एक अधिकारी श्री. अप्रबुद्ध यांचा या विषयावरील इंग्रजीतच ग्रंथ आहे. श्री. अप्रबुद्ध हे नागपूरला असतात. हे या विषयात अधिकारी आहेत. विशेष म्हणजे मोगल सम्राटाच्या अमदा-नीत अनेक सिद्धीसंपन्न ब्राह्मण व योगी पोटाकरिता बादशहापुढे सिद्धीचे चमत्कार करून दाखवीत. असे लेख रविवारच्या सकाळमध्ये मध्ययुगी भारतातील

काही इंग्रजी ग्रंथावरून अनुवाद करून आले आहेत. ते अंक डॉ. गाडगिळांनी संपादून अवश्य पाहावे. त्यामध्ये आकाशावर संयम करून आकाशाइतके हल्के शरीर करून बादशहाच्या समोरून योगी एकदम उडून अंतराळात जात व अंतर्धान पावत अशी चित्रे मी स्वतः पाहिली आहेत.

टिपू सुलतानाने पेशवे, इंग्रज इत्यादींची स्वारी श्रीरंगपट्टणावर झाली, त्यावेळी जय मिळावा म्हणून अनेक ब्राह्मण व योगी अनुष्ठानास बसविले. काही योगी शीर्षासने करून गुडघ्या इतक्या पाण्यात उलटे उभे राहून तप करीत आहेत, अशी चित्रे मी पाहिली आहेत. डॉ. गाडगिळांनी त्यावेळचे मूळचे इंग्रज लिखित ग्रंथ पाहून योगसिद्धीची खात्री करून घ्यावी. इंग्रजाने लिहिलेले ग्रंथ केवळ भावनेने लिहिलेले नाहीत तर प्रत्यक्ष व (तर्क) अनुमान प्रमाणयुक्त ते असतात यास्तव त्यांचा उल्लेख केला.

सातार्‍यांस चिमणपुर्‍यामध्ये राहणार्‍या श्री. बाबा कोल्हटकरांनी योगशास्त्र, हा एक उत्कृष्ट ग्रंथ लिहिला. अनेक पुस्तके वाचूनच नव्हे तर योगशास्त्राच्या आठही अंगाचा यथाशक्ति अनेक वर्षे अभ्यास करून ग्रंथ लिहिला आहे. त्यामध्ये योगसिद्धीचे विविध अनुभव शेवटी परिशिष्टामध्ये दिलेले आहेत. ते सर्व अलीकडील म्हणजे प्रत्यक्ष अनुभविलेले आहेत. तो ग्रंथही डॉ. गाडगिळांनी पाहिला नसल्यास पहावा व हे ग्रंथ आग्रहशून्य बुद्धीनेच पहावे, कारण 'बुद्धेः फलमनाग्रहः' हाच सिद्धान्त होय.

## शंभर वर्षापूर्वीचे मोठे उदाहरण

दक्षिण भारतात श्री. सदाशिवेंद्र सरस्वती हे एक मोठे योगी व पारमार्थी होऊन गेले त्यांची योगसूत्रावर व ब्रह्मसूत्रावर वृत्ती– (स्पष्टीकरण संक्षिप्त टीका) आहे. हे दोन्ही ग्रंथ श्रीरंगमच्या वाणीविलासने प्रसिद्ध केले आहेत. योगसूत्रवृत्तीच्या ग्रंथाला इंग्रजी व संस्कृत असे दोन उपोद्घात आहेत. डॉ. गाडगीळानी मोठ्या विद्वानांनी लिहिलेला तो इंग्रजी उपोद्घात व त्यातील श्री सदाशिवेंद्रांचे योगसिद्धीचे चमत्कार वाचावेत व त्यांचा पुनः पुनः विचार करावा व नंतरच त्या थापा किंवा गप्पा म्हणाव्या.

सत्य थोडे, सूक्ष्म, दुर्ज्ञेयच असते व त्यावर असत्य, थापा, कल्पना, वाढतात हे मान्य करूनही असे म्हणता येईल की वैदिकपरंपरेमध्ये पातंजलयोग हे एक सुप्रतिष्ठित शास्त्र आहे, त्याला श्रुतीस्मृतींचा आधार आहे व आचार्य आणि संत यांनी त्याचा साक्षात्कार मार्गाने उपयोग केलेला आहे. ऋषी, आचार्य, संत या सर्वांना एकजात थापाडे, थोतांडे असे म्हणणे साहसच होय. आज योगसिद्धीचे अधिकारी नाहीत, आज क्षत्रिय राजा नाही, चातुर्वर्ण्यही नाही म्हणून पूर्वी ते कधी नव्हते त्या केवळ गप्पा होत, असे म्हणणे हे मोठे साहस होय. कारण चातुर्वर्ण्य– व्यवस्थेवर आचार, व्यवहार, प्रायश्चितादि ग्रंथ आहेत. अश्वमेधादि यज्ञांवर श्रौतसूत्रे, कल्पसूत्रे इत्यादी ग्रंथ आहेत व ते अग्निहोत्री व वैदिक वर्गाने सर्व प्रांतात गेली हजारो वर्षे जतन करून ठेवले आहेत. अशा सर्वांना गप्पा, थापा म्हणणे साहसच आहे.

## सर्वच थापेबाज कसे ?

भगवान् पतंजली ऋषीने सिद्धीच्या थापा मारल्या तर अन्यशास्त्रकार गौतम कणाद, कपिल, जैमिनी, बादरायण यांनी त्या का मान्य कराव्या. परपक्ष खंडणामध्ये अत्यंत दक्ष असलेले हे शास्त्रकारही थापांना मान्यताच देतात असे म्हणणार काय ? फार तर एकादा अगर दोघे थापा मारतील व त्या काही दिवस खर्‍या समजल्या जातील. कित्येक शतके हा सिद्धीचा विषय भारतीय परंपरेमध्ये आहे. सर्व शास्त्रकार भारत व भागवत कर्तेही अष्टसिद्धी, गौणसिद्धी व क्षुद्रसिद्धी मानतात परंतु मोक्षमार्गामध्ये " ते समाधौ उपसर्गाः " त्या विघ्नेच होत असे म्हणतात. मोक्ष मार्ग प्रवृत्त साधकाला तो कोणत्याही साधनाभ्यासात असो त्याला या सिद्धी विघ्नेच होत असे सर्व शास्त्रकार, आचार्य, व संत यांचे मत आहे. श्रीज्ञानेश्वर त्या परंपरेतीलच होते म्हणून त्यांनी ओघाने आलेल्या विषयाची स्पष्टता करण्याची संधी ज्ञानेश्वरीत साधली इतकेच.

## ज्ञानेश्वर, श्रीकृष्ण व योगशास्त्र

डॉ. गाडगीळ लिहितात की, श्रीकृष्णाच्या स्वप्नात नसलेले योगशास्त्राचे शब्द ज्ञानेश्वरानी येथे आणले. ज्ञानेश्वरी अ. ६ श्लो. १४ आ. २९१/९२ पहा. पिंडाने पिंडाचा ग्रास करणे हा नाथ संप्रदायातील संकेत श्री

विष्णूंनी ध्वनित केला तो मी तुम्ही निवृत्तिप्रमुखश्रोते या विषयाचे रसिक, चाहते व ग्राहक पाहून मी तो विषय एकाद्या सणंगाच्या घडी प्रमाणे उघडून स्पष्ट केला. ज्ञानेश्वर श्रीकृष्णाच्या स्वप्नात नसलेला विषय येथे सांगत नसून पातंजलयोग, राजयोग यांच्याच संदर्भामध्ये जे भगवंतानी ध्वनित केले तेच मी उघडे केले, असे म्हणतात. तो विषय त्यांच्यापुरता होता. त्यांनी उपदेश करिताना " योगयाग, याने ईश्वरप्राप्ती होत नाही " असेच म्हटले आहे. ज्ञानेश्वरांचा भर, अद्वैतभक्ती आत्मज्ञान, ' ज्ञानादेवतुकैवल्यम् , ' यावरच आहे. म्हणून भागवतधर्माचे ते प्रवर्तक होत. त्या धर्माचा पायाच त्यानी घातला. ज्याकरिता देह धारण केला ते कार्य संपल्यावर देह ठेविला ही आत्महत्त्या नाही. अखंड आत्मसुखार्थ अशरीरी आत्म्याशी तद्रूप होणे होय.

**-पं. महादेवशास्त्री दिवेकर**

( ५ )

स. न. वि. वि.

" व्यासोच्छिष्टम् जगत् सर्वम् " ह्या माझ्या लेखाने कित्येकांच्या मनाला धक्का बसणे, तसेच कित्येकांची अंतःकरणे दुखावली जाणे साहजिक होते. त्यासंबंधाने मी येथे काही लिहीत नाही. हे पत्र लिहिण्याचा हेतु प्रा. वऱ्हाडपांडे, यांचे आभार मानणे हा आहे प्रा. वऱ्हाडपांडे यानी रामासंबंधाने मी केलेले विधान चुकीचे असल्याचे माझ्या निदर्शनास आणले हे त्याचे मजवर उपकार आहेत. रामायणाचा मी अभ्यास केला आहे परंतु काय असेल ते असो, दाशरथी राम हा आर्य, क्षत्रिय व वर्णाने गोरा असला पाहिजे अशी माझी भ्रामक पण दृढ समजूत झालेली होती. माझ्या मनाला शंका शिवलेली नसल्यामुळे मी आधार पाहण्याच्या नादी लागलो नाही. मात्र प्रा. वऱ्हाडपांडे यांचा आक्षेप वाचल्यावर मी रघुवंश, रामायण वगैरे ग्रंथांचे पुन्हा अवलोकन केले व माझी चूक मला कळून आली राम श्यामवर्णी होता व सीता ही निराळी नव्हती हे मला तेव्हा समजून आले.

ह्यानंतर व्यास आणि कृष्ण ह्यांच्याच पंक्तीला दाशरथी रामाला बसावे लागेल ह्या दिशेने मी विचार करू लागलो. कर्मधर्मसंयोगाने त्रिवेन्द्रम् येथे प्रसिद्ध होणाऱ्या ऐतिहासिक संशोधनाचे गेल्या एप्रिल महिन्याचे नियतकालिक माझ्या हाती आले. त्यामधील पहिलाच लेख डॉ. राव यांचा होता. तो वाचीत असता कोसल इत्यादी जमातीसंबंधाने " दे वेअर दि एन्शन्ट ट्राइब्स ऑफ इंडिया " असे त्यानी केलेले एक विधान मला आढळले. ह्याला आधार पाली ग्रंथाचा दिला होता. मला पाली येत नसल्यामुळे व वरील वाक्याचे अधिक स्पष्टीकरण करून घेण्याची आवश्यकता भासल्यामुळे मी डॉ. प. ल. वैद्य ह्याना पत्र लिहून विचारले की कोसलादी कुले सिंधुनदीच्या पलीकडून आली नाहीत व त्यांची वैदिक संस्कृती नव्हती; ही कुले मूळची हिंदुस्थानातीलच होती असे समजावयाचे की काय ? त्यानी स्पष्ट लिहीले की, सिंधूच्या पलीकडून वैदिक आर्य आले तसा ह्या जमाती आल्या नाहीत. त्याची संस्कृती नव्हती परंतु वैदिक वाङ्मयाचे त्यांचे परिशीलन होते.

असो. मी काढलेली अनुमाने जर बरोबर असतील तर रामायण, महाभारत ह्या आपल्या दोन ग्रंथांचा फेरविचार करण्याची आवश्यकता उत्पन्न झाली आहे, असे मला वाटते.

**– नारायण गोविंद चापेकर**











## सारसंकलन

### अंतराळाची भानगड

अंतराळाची भानगड अशी आहे की, ते अतिशय मोठे आहे पण त्यात वस्तु मात्र विशेष नाहीत. थोडेच दिवसापूर्वी अंतराळाचा प्रवास करून आलेल्या रशियन व अमेरिकन वीरासुद्धा आतापर्यंत हा प्रवास, १७ पुरुष १ स्त्री यांनी यशस्वीपणे केला आहे. आणि परत आल्यावर या सर्वांनी काय सांगितले, तर अंतराळातील रंग फारच सुंदर अगदी कल्पनेपलीकडे सुंदर, पृथ्वीवर कधीही न दिसणारे, इंद्रधनुष्यातील रंगापेक्षाही सुंदर, वर्णनाचे व मोजमापाच्या पलीकडचे असे आहेत.

आणखी काय ? दहा मिनिटे अंतराळयानाच्या बाहेर तरंगत राहिलेले ले. कर्नल लेनॉव्ह म्हणाले की, 'तेथे ओळखीचे कोणी भेटण्याची आशाच नव्हती.' वीस वर्षाच्या अंतराळ संशोधनाचे बहुतेक निष्कर्ष नकारात्मक आहेत. तेथे कर्णमधुर संगीत नाही, चंद्रावर हिरवे चीज मिळत नाही, मंगळावर पाण्याचे कालवे नाहीत तर शुक्रावर हवामान नाही. सर्वच नन्नाचा पाढा. माणसाच्या डोळ्यांना, त्याने प्रक्षेपित केलेल्या यंत्रांना 'रेंजर ९' वर असलेल्या अति प्रभावी चित्रवाणीच्या यंत्राला कोठे काहीच दिसले नाही. आणि ते अनपेक्षितही नव्हते. मग रशिया व अमेरिका यांचा सर्व शक्ति पणाला लावून जो शास्त्रीय आटापाटा चालला आहे तो, चंद्र, तारे व ग्रह या संबंधीची शास्त्रीय गृहीत कृत्ये पडताळून पाहण्याकरताच का ?

### अंतराळात आहे काय ?

गेल्या वीस वर्षातील संशोधनानंतर व विशेषतः रशियाने पहिला उपग्रह अंतराळात सोडल्यापासून अंतराळात व्यवस्थितपणे कसे जाऊन यावयाचे या गोष्टीवर सर्व भर देण्यात येत आहे. तेथे काही सापडणे न सापडणे गौण झाले आहे. विश्वरचनेचा अभ्यास करणाऱ्या व त्यावर जन्मभर संशोधन व मनन करणाऱ्या अनेक शास्त्रज्ञांनी अंतराळात काहीही नाही असे पूर्वीच सांगितले आहे. व आतापर्यंत त्यांचे म्हणणे खरे ठरले आहे. या सर्व अंतराळ भ्रमणाने एकच गोष्ट शोधून काढली आहे. व ती म्हणजे पृथ्वी भोवती असलेला किरणोत्सर्गी पट्टा. गणितशास्त्रज्ञांनी याचेही अस्तित्व हेरले होते हे कबूल करणे भाग आहे. या पट्ट्यातील वातावरण माणसास धोकादायक असून अंतराळयान सुद्धा यात फार वेळ राहिल्यास बिघडण्याची शक्यता आहे.

अंतराळात प्रक्षेपित केलेल्या निरनिराळ्या यंत्रानी, सूर्यापासून निघणारे वारे अंतरळात तरंगणारे पदार्थ ( matter ), हवामानाच्या रासायनिक घटकांचा शोध, चंद्राच्या मुखपृष्ठाची पहाणी इत्यादि गोष्टींबद्दल माहिती गोळा केली. ही सर्व माहिती प्रयोगशाळेत बसून जमा केलेल्या माहितीपेक्षा वेगळी नाही. ही सर्व माहिती कुतूहल वाढवणारी किंवा आश्चर्य वाटण्याजोगी असली तरी डोळे फिरवणारी नाही. यावरून दोनच निष्कर्ष निघू शकतात. एकतर अंतराळात नव्याने शोधण्यासारखे काहीही नाही किंवा जे शोधून काढण्यासारखे आहे ते कोठे व कसे शोधावे हे माणसास कळलेले नाही. आणि त्यात अशक्य असे काहीच नाही. कारण सुरवातीला प्रक्षेपित केलेली अनेक अंतराळयंत्रे चुकीच्या दिशेने सोडली गेली, ती तेथे पोचलीच नाहीत.

### अंतराळ संशोधन व व्यवहार

पण या संशोधनाचे व्यवहारात अनेक महत्त्वाचे उपयोग आहेत. यामुळे रशिया व अमेरिका एकमेकांच्या व इतरही सर्व राष्ट्रांच्या लष्करी हालचालींची इत्थंभूत बातमी मिळवीत आहे. चीनचा अणुबॉंब उडण्यापूर्वीच चिनी मनोऱ्याचे उत्तम छायाचित्र अमेरिकेला काढता आले होते. कोणाचीही महत्त्वाची लष्करी हालचाल आता गुप्त रहाणे कठीण होईल. दुसरा एक महत्त्वाचा फायदा म्हणजे हवामानातील फरक वेचणारे उपग्रह. हवामानासंबंधी बिनचूक माहिती प्रक्षेपित करीत आहेत. दुसऱ्याच्या अण्वस्त्रांचा भाग लावणाऱ्या उपग्रहाबद्दल अजून फारसे ऐकू येत नाही. कदाचित् , व्यवहारात वापरता येण्याइतका तो यशस्वी झाला नसेल किंवा पोलॅरिस पाणबुडीइतका संपूर्ण यशस्वी झाल्यामुळे अंतराळात भ्रमणही करीत असेल.



अनुक्रमणिका

हैड्रोजन बॉंब उपग्रहातून सोडण्याची भाषा अजून कोणी बोलत नाही. व त्याची कारणेही उघड आहेत. माणूसरहित उपग्रह दिशा चुकण्याची शक्यता आहे तर माणसाने चुकवलेली दिशा तर भयंकरच ठरेल. थोड्याच दिवसात दूरवाणी ( टेलिफोन ) व चित्रवाणी ( टेलिव्हिजन ) यांचे निर्वेध दळणवळण अंतराळातील उपग्रहाद्वारा सर्वत्र होण्याची शक्यता निर्माण झाली आहे. ते समुद्रातील तारांच्या दळणवळणापेक्षा जास्त सोपे, स्वस्त व चटकन होईल हे विशेष होय.

## अंतराळ संशोधनाचे भवितव्य

या सर्व गोष्टी लक्षात घेऊनसुद्धा अमेरिका व रशिया या दोन देशांनी, अनेकांचे जीव धोक्यात घालून, अनेकांच्या राजकीय कारकीर्दी पणास लावून काय मिळवले तर मानवी मनाचे समाधान असेच उत्तर द्यावे लागेल. माणूस आपल्या नैसर्गिक वातावरणाच्या पलीकडे जाऊन अंतराळात फिरू शकतो हे पाहिल्यावर आपण माणूस आहोत या गोष्टीचा अभिमान वाटतो. व नैतिकमूल्ये नष्ट होत असलेल्या या जगातून परलोकात जाण्याऐवजी इथेच पिढ्यान् पिढ्या बर्फघरात (deep freeze) बसून राहून, कालान्तराने पुन्हा जगात येण्याची इच्छा होणे साहजिकच आहे. कारण त्यावेळी अंतराळात फिरणे सहज शक्य होईल व धर्माने मिळवून दिलेल्या समाधानापेक्षा हे अंतराळभ्रमणाचे समाधान कदाचित् जास्त विलोभनीय असेल. आणि या समाधानासाठीच तर सोव्हिएट रशिया तन-मन-धन खर्च करीत नाही ना ? ले. कर्नल लेनॉव्ह याचा अंतराळ प्रवेश म्हणजे अंतराळ स्थानके तयार करण्यातील पहिली पायरी होय. अशी स्थानके तयार झाली म्हणजे चन्द्रावर जाण्याची पूर्वतयारी झाली असे म्हटले पाहिजे.

## मानवी उत्क्रान्ति

पृथ्वीच्या वर शंभर मैलाच्या पलीकडे अजून कोणीही माणूस गेलेला नाही. तसे जाणे धोकादायक आहे. किरणोत्सर्गी पट्ट्यातून त्याला क्षणार्धात पलीकडे जाता आले पाहिजे. रशिया व अमेरिका यांचे या दिशेने चालू असलेले प्रयोग विलक्षण आहेत. त्यासाठी लागणारे मानवीधैर्य अतुलनीय आहे. ऐतिहासिक दृष्टीकोणातून विचार करता तर ते प्रयोग अद्भूतच वाटतात. कोट्यवधी वर्षापूर्वी पाण्यातून बाहेर पडणाऱ्या माशाचे बांधव त्याला हसले असतील. 'जमिनीवर काहीही नाही. तिथे जाण्याचे धाडस कशा करता करावयाचे' असेही त्यांना वाटले असेल. ले. कर्नल लेनॉव्ह यांचे अंतराळातील तरंगणे याच प्रकारचे असेल का ? माणसाने उत्क्रान्तीची परिसीमा गाठली आहे हे म्हणणे धाडसाचे होणार नाही का ? लक्षावधी पिढ्यानंतर मानव अंतराळात उत्क्रान्त होईल का ?

## अंतराळाची शुद्धता

हे जर शक्य असले तर अंतराळ शुद्ध व स्वच्छ ठेवण्याची खबरदारी घेणे जरूर आहे. सुरवातीस या अजस्त्र पोकळीत फेकलेल्या दोन वस्तु एकमेकास भेटणे अशक्य आहे असे वाटत होते. परंतु रशियन अंतराळवीरांना निकामी झालेले काही उपग्रह आपल्या यानाच्या खिडकीतून पहावयास मिळाले. अंतराळयानाचे इंजिनीअर्स या निकामी वस्तूंना पकडण्यासाठी जाळे तयार करण्याची भाषा बोलू लागले आहेत. अमेरिकेने अनेक निरुपयोगी वस्तु अंतराळात प्रक्षेपित केल्या आहेत. अनेक अणुबॉम्बस् अंतराळात फोडून ते दूषित केले आहे. त्यातील किरणोत्सर्गी पट्टा डिवचला असून तो जास्त प्रज्वलित केला आहे. त्यामुळे एका विशिष्ट कक्षेत अजून दहा वर्षे तरी उपग्रह सोडणे अशक्य झाले आहे. काही रेडिओ सिग्नल्स आडवण्याकरता त्यांनी असंख्य तांब्याच्या सुया अंतराळात पसरल्या आहेत. दहा लक्ष डॉलर्स किंमतीचे अमेरिकन प्लुटोनियम अतराळात कोठेतरी भ्रमण करीत आहे, हे सर्व अत्याचार शक्य आहेत कारण आंतरराष्ट्रीय अंतराळकायदे करणारे मंडळ आज अस्तित्वात नाही. अंतराळात जाण्यासंबंधी नियम करण्यासंबंधी चर्चा चालू असता, अंतराळातील वातावरण मात्र दूषित होत आहे. यक्षकिन्नरांना रडविण्याइतके ते दूषित झाले आहे.

—दि इकॉनॉमिस्ट, लंडन २७ मार्च १९६५

## ब्रिटनचे चलन संकुचन

ज्यावेळी ब्रिटिश नौदलाचे सातासमुद्रावर साम्राज्य होते व मार्मलेड ( ब्रिटनचे आवडते खाद्य ) जगात राजासारखे मिरवत होते; त्यावेळी सर्व दिशांनी ब्रिटनमध्ये पैसा ओतला जात होता. जणुकाही किनाऱ्यावर आपटणारी प्रत्येक लाट पौंडचे पौंड फेकीत होती.



अनुक्रमणिका

पण आता दिवस बदलले आहेत. दुसऱ्या महायुद्धा-नंतर ब्रिटन आपल्या अवाक्याच्या बाहेर खर्च करीत आहे. सरकारामागून सरकार या आर्थिक संकटाचे निराकरण करण्याचा प्रयत्न करीत आहे. आणीबाणी टाळण्यासाठी निरनिराळे प्रयोग करीत आहे.

हॅरोल्ड विल्सन यांची कारकीर्द पण अशा आणी-बाणीच्या परिस्थितीतच सुरू झाली. त्याना सुरवाती-सच समाजवाद विस्तृत करण्याच्या व सढळ हाताने खर्च करण्याच्या सर्व योजना टाकून द्याव्या लागल्या. सुवर्णाचे व चलनाचे साठे झपाट्याने कमी झाले आहेत. हा साठा आता २००·४ कोटी डॉलर्सवर आला असून परराष्ट्रीय व्यापारात पडणारा तुटवडा भरून काढण्यास जेमतेम पुरेसा आहे. पौंडाचे अव-मूलन थांबविण्यासाठी विल्सनना ३०० कोटी डॉलर्सचे परदेशी कर्ज उभारावे लागले व सर्वांचे मनाविरुद्ध आयातकर बसवावा लागला. परंतु ही नुसती सुरवात होती. गेल्या आठवड्यात ब्रिटिश अर्थमंत्री जेम्स कॅलाघन यांनी अर्थसंकल्पावरील आपला वार्षिक अह-वाल सादर करताना पार्लमेंटला चांगलेच हादरे दिले.

## माळराने भाड्याने देणे आहेत

ब्रिटनमधून बाहेर जाणाऱ्या २८ कोट डॉलर्सच्या चलनावर आळा घालण्याकरता कॅलाघानने ब्रिटनच्या परदेशी भांडवल गुंतविण्याच्या धोरणावर निर्बंध घातले असून परदेश प्रवासासाठी माणशी एका प्रवासासाठी फक्त ७०० डॉलर्सची तरतूद केली आहे. दुसरा उपाय म्हणजे ब्रिटनच्या बाजारात फिरत असलेला पैसा कर-वाढीने काढून घेऊन चलनवाढ थांबविणे हा होय व तोही अंमलात आणण्यात येऊन जवळ जवळ ७० कोट डॉलर्स सरकारी गंगाजळीत पुन्हा दाखल करण्यात आहे. अनेक गोष्टीवरचे कर वाढवण्यात आले. व्हिस्कीच्या बाटलीची किंमत ५६ सेंटसनी वाढवली तर बिअरच्या एका पाइंटमागे एक पेनी वाढवली, सिगरेटच्या पाकिटा-मागे तर ७५ सेंट्स पर्यंत किंमत वाढवली आहे. नवा कंपनीकर बसवला असून आतापर्यंत कधीही कर न बसविलेल्या 'कॅपिटल गेन' (Capital gain) वर पण तीस टक्के कर लादला आहे.

मजूरपक्षाचा विरोध सहन करूनसुद्धा ब्रिटिश सर-कारने टि एस आर– २ या नमुन्याचे अणुशक्तीवर चालणारे विमान बनविण्याची २० कोटी डॉलर्सची योजना रद्द करून स्वस्त दराने अमेरिकन एफ १११ ए ही विमाने खरेदी करण्याचे ठरवले आहे. कॅलिघानने उद्योगपतींच्या खर्चावरील करातील सूट-पण रद्द केली आहे. त्यांचे म्हणण्याप्रमाणे राजशाही फ्रॅट्स खर्चाच्या बाजूस टाकले जातात, धंद्याचे खर्चाच्या नावाखाली सर्व सुखसोईंनी युक्त अशा नावा नौकाविहारासाठी भाड्याने घेण्यात घेतात, फार काय स्कॉटलंडमधील माळराने सुद्धा उद्योगपती भाड्याने घेऊन पैसे करतात.

डेली एक्सप्रेस, कॅलिघान हा चिकट म्हणतो तर टोरीस्केच त्याच्या अर्थसंकल्पाचे वर्णन 'राजकीय गैर-समजुतीवर आधारलेला जुनाट समाजवादी अर्थ-संकल्प' असे करतो. परंतु कॅलिघानला पाठिंबाही अनेक ठिकाणाहून मिळाला आहे. हा अर्थसंकल्प अप्रिय असणार हे सर्वांनाच माहीत होते हे हुजूर-पक्षीय डेली मेलचे म्हणणे तर मिररचा मजूरपक्षीय प्रतिनिधी म्हणतो की, "कॅलिघानने नाक पकडून औषधाचा कडू घोट आमच्या घशात घातला. आपण वाईट तोंड करून का होईना तो गिळला व त्या नंतर कॅलिघानला दोन शिव्या दिल्या. पण तो ऐकत नाही असे पाहून एकमेकास म्हटले की यात फारसे अनपेक्षित काहीच नव्हते. हे सर्व येणारच होते."

## खांद्याला खांदा लावून

कॅलाघानने श्रीमंतावर जास्त बोजा लादला असला तरी त्याच्या अर्थसंकल्पातील बरेचसे मुद्दे हुजूर पक्षाच्या अर्थशास्त्रातून उचललेले आहेत. व त्यामुळेच चलन संकुचन सेल्सटॅक्स व सरकारी विक्रीकर व सरकारी खर्चातील कपात या सर्वांबद्दल कट्टर समाजवादी व बॅंकर्स हे दोघेही टाळ्या वाजवताना दिसत आहेत.

विल्सनला त्याच्या अनुयायाकडून किंवा मतदारा-कडून फारसे प्रोत्साहन मिळत नाही. पार्लमेंटमधील त्यांचे मताधिक्य सुद्धां तीन मतांचेच आहे. परंतु या जूनमध्ये जर विल्सनने निवडणुका घ्यायच्या ठर-वल्या तर हे मताधिक्य शंभरावर जाण्याची शक्यता मात्र सर्वत्र बोलली जात आहे. विल्सन मात्र अशी वेळ आल्यास विचारात पडेल, कारण त्याने राष्ट्राला

दिलेला कडक अर्थसंकल्प निवडणुकीत कदाचित् त्याच्या विरुद्धही जाईल.

टाइम– न्युयॉर्क १६ एप्रिल १९६५

## अमेरिकन्स व व्हिएटनामीज यांचेतील विघडलेले दळणवळण

दक्षिण व्हिएटनाममधील अमेरिकन दळणवळण उत्कृष्ट व कार्यक्षम आहे. त्यामुळे दक्षिणचीनी समुद्रावरून उडणाऱ्या एखाद्या वैमानिकाशी किंवा प्रत्यक्ष पेंटॅगॉनशी एक मिनिटाचे आत संबंध जोडता येतो. परंतु याच यंत्रणेचा सायगावला, जमिनीशी संबंध आला की सर्व काही बिघडते. शहराच्या एका भागातून दुसऱ्या भागात निरोप पोचवायचा असल्यास प्रत्यक्ष माणूस पाठवावा लागतो. टेलिफोनवर अवलंबून राहता येत नाही. ही परिस्थिति फक्त अमेरिकन सिग्नल्सचीच आहे असे नसून सर्वच युद्धआघाडीवर हा गोंधळ चालू आहे. फक्त अमेरिकन्सच एखाद्या गोष्टीबद्दल जबाबदार असतील तर ती गोष्ट बिनबोभाट व व्यवस्थित होते. परंतु त्यात व्हिएटनामीजचा संबंध आला की गोंधळास सुरवात होते.

### युद्ध दुसऱ्याचे

आणि याचे कारणही उघड आहे. कारण व्हिएटनामी लष्करी व मुलकी दोन्ही अधिकाऱ्यांना हे युद्ध आपले नसून अमेरिका व चीन यांचा झगडा इथे झगडला जात आहे असे वाटते. पुष्कळवेळा हे अधिकारी हे स्पष्टपणे बोलूनही दाखवतात. सायगावमध्ये अलीकडे दोन घोषणा प्रामुख्याने ऐकू येतात. एक म्हणजे "यांक, आपले भांडण दुसरीकडे कोठेतरी जाऊन भांडा" व दुसरे म्हणजे "ज्याला लढायचे नसेल त्याला पळण्याची गरज नाही."

लष्करी व मुलकी कारभार व्यवस्थितपणे चालवण्याच्या अमेरिकन सल्ल्याचा काहीही उपयोग होताना दिसत नाही. व्हिएटनामचे चारही सेनापति आपली कामे व्यवस्थित करू शकत नाहीत कारण त्यांना सायगावचे सहकार्यच मिळत नाही. त्यांच्या पैशाच्या साधनसामुग्रीच्या व माणसांच्या मागण्याकडे कानाडोळा केला जातो. सरकारला सर्व आर्थिक व्यवहार आपल्या ताब्यात ठेवावयाचे आहेत. व सेनापतींना मदत देऊन जर त्यांना कार्यक्षम केले तर ते डोईजड होऊन आपले सवते सुभे निर्माण करतील किंवा सायगावच ताब्यात घेण्याचा प्रयत्न करतील. कागदोपत्री प्रत्येक सेनापतीच्या हाताखाली दोन लष्करी तुकड्या आहेत परंतु प्रत्यक्षात त्यांचे माणूसबळ फारच कमी आहे. अधिकाऱ्यांची संख्या तर फारच तुटपुंजी आहे. त्यांना इतर प्रकारची कोणतीच मदत उपलब्ध नाही. विशेषतः वैद्कीय मदत व हॉस्पिटल्स यांची उणीव तर फारच मोठी आहे. स्थानिक लष्करी राज्यपालाने भरती केलेली नागरीक सेनापण या सेनापतींच्या ताब्यात आहे. त्यांचा उपयोग खेड्यांच्या संरक्षणास थोडाफार होतो पण त्यांचा मुख्य उपयोग म्हणजे स्थानिक लोकांना व्हिएटकाँगमध्ये दाखल होऊ न देणे हाच होय. सर्व संरक्षित ( Reserve-force ) सेना सायगावला किंवा त्यांचे आसपास ठेवलेली आहे.

हवाईदलातील परिस्थिती यापेक्षा चांगली आहे. कारण त्याचा सेनापति एअर मार्शल न्यु एन्स-कॉव-के हा अमेरिकेच्या विश्वासातील आहे. व्हिएटनाम सरकारला तो जास्त बलवान होत आहे असे वाटत असून त्याला त्याच्या हुद्यावरून काढून टाकण्याचा फार मोठा धोका आहे. त्याला काढताना अमेरिकेला त्याचेबद्दल रदबदली करता येणार नाही अशी काळजी घेतली जाण्याची शक्यता पण आहे.

### बातम्या मिळविणे अशक्य

लष्करीदृष्ट्या सर्वांत कच्चा दुआ म्हणजे व्हिएटकाँगच्या हालचालीबद्दल खात्रीदायक बातमी न मिळणे हा होय. साधारणपणे एकच भाषा बोलणारे लोकच युद्धात दोन्ही बाजूला असल्यानंतर एकमेकाच्या बातम्या समजणे कठीण जात नाही. परंतु दक्षिण व्हिएटनाममध्ये तसे होत नाही. व्हिएटकाँगला मात्र दक्षिणेतील सर्व बातम्या व्यवस्थितपणे मिळत असतात.

अमेरिकन्सना व्हिएटकाँगच्या गुप्त बातम्या न मिळाल्यामुळे बऱ्याचवेळा गनिमीयुद्धात व जमिनीवरील युद्धाचे नेतृत्व व्हिएटकाँगकडेच रहाते. पुष्कळवेळा व्हिएटकाँगच्या हातून अनेक चुकापण होतात. परंतु त्याचा फायदा अमेरिकन्सना मिळत नाही. व्हिएटकाँगकडे दळणवळणाची आधुनिक साधने








फारशी नसताना व अँटीएअरक्रॅफ्ट गन्सचा तुटवडा असतानासुद्धा त्यांच्या म्हणण्याप्रमाणे तीनचतुर्थांश देश त्यांचे अंमलाखाली आहे. आणि रात्रीच्या वेळी खरोखरीच ही सत्य परिस्थिती आहे. दिवसाउजेडी-सुद्धा अर्धा देश तरी व्हिएटकाँगच्या ताब्यात आहे.

व्हिएटकाँग, चीन किंवा इतर कोठल्याही देशाकडून मदतीची फारशी अपेक्षा करीत नाहीत. काही लहान-सहान हत्यारे, मशीनगन्स किंवा हातबॉंबस् चीनकडून मिळाले तरी पुष्कळ आहे असे त्याना वाटते. कारण जास्त नसली तरी निदान वॉशिंग्टन इतकीच युद्ध पसरण्याची भीती चीनला पण वाटत आहे. अमेरिकन हवाईदलाचे वर्चस्व व्हिएटकाँग कबूल करीत आहेत. कारण जंगलातून लागणाऱ्या मोठमोठ्या आगीच्यामुळे झाडाझुडपात लपून बसणाऱ्या बऱ्याच गनिमांना आपल्या जागा सोडून परत फिरावे लागले आहे. परंतु एकदा पावसाळा सुरू झाला व वाईट हवेमुळे हवाई हल्ले थंडावले म्हणजे ते पुन्हा पूर्वीच्या ठिकाणी येतील हे निश्चित.

सायगावच्या उत्तरेस, समुद्रकिनाऱ्याजवळील मोठा वाहतुकीचा रस्ता, मोठ्या मुष्किलीने सरकार उघडा ठेवू शकत आहे. महत्त्वाचा लष्करी तळ असलेले फ्रेक्यु हे ठिकाण कोणत्या क्षणी वहातुकीपासून तोडले जाईल याचा नियम नाही. लष्कर किंवा इतर हलक्या वजनाची साधनसामुग्री हवाई मार्गाने इकडून तिकडे नेता आली तरी जड शस्त्रास्त्रे व विशेषतः पेट्रोलियम खुष्कीच्या मार्गानेच नेणे भाग आहे. अनेकवेळा व्यापारी तेल कंपन्यांना व्हिएटकाँगला वहातुकीसाठी पैसा किंवा तेल चारावे लागते. परंतु सर्वच तेल जर हवाई मार्गाने न्यावे लागले तर मात्र कठीण परिस्थिती निर्माण होईल.

## अमेरिकेचे वर्चस्व

व्हिएटनामच्या मच्छीमारी बोटींच्यात मिसळून गेलेल्या अनेक छोट्या छोट्या हेरगिरी करणाऱ्या बोटींच्याकरवी अमेरिकेचा व दक्षिण व्हिएटनामचा किनाऱ्यावर ताबा आहे असे वाटते. तीन मैलाच्या आंतरराष्ट्रीय मर्यादेपलीकडून या सर्व हालचालीवर रशियाच्या इलेक्ट्रॉनिक ट्रॉवलर्सचे लक्ष आहे हे निश्चित. अमेरिकेला उत्तर व्हिएटनामचे दळणवळण तोडण्यातही बरेचसे यश आले आहे व त्यामुळे उत्तर व्हिएटनामचे सैन्य सातव्या अक्षांशाच्या जवळ गोळा होणे अशक्य झाले आहे. उत्कृष्ट रडार निरीक्षणामुळे चीनच्या, मिग १५ व १७ या विमानांच्या बारीकसारीक हालचाली-वर सुद्धा अमेरिकेचे लक्ष रहात आहे.

एकदा चीनी मिग विमानाने अमेरिकन्सना अचानक पकडले होते. पण तेव्हापासून ते जास्त जागरूक झाले आहेत. अमेरिकेने नवीनच वापरण्यास सुरवात केलेल्या एफ् १०५ ह्या विमानाला जळणाचे जास्त लोढणे बरोबर ठेवावे लागत नाही, त्यामुळे कोणत्याही मिग विमानाला ते लोळवू शकेल. व रशियाने चीनला पाठ-वलेल्या ३ एल् २८ एस् या विमानांचा ठिकाणावर पोचण्यापूर्वीच धुव्वा उडवणे अमेरिकेला सहज शक्य होईल. चीनची भीती कमी झाली असून अमेरिकेचे समुद्रावर व हवेवर संपूर्ण वर्चस्व प्रस्थापित होत अस-तानाच हळू हळू का होईना दक्षिण व्हिएटनाम सर-कारने जमिनीवर शांतता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करणे अत्यावश्यक आहे एवढेच प्रत्येक अमेरिकन सेनानीचे म्हणणे आहे.

इकॉनॉमिस्ट, लंडन, १७ एप्रिल १९६५

## नम्र मध्यस्थी

इंडोनेशियाचे मलायाविरोधी गनिमी युद्ध किंवा दक्षिण व्हिएटनाममधील यादवी थांबविण्याचा सोपा उपाय नाही याची जपानला पूर्ण जाणीव आहे. परंतु मुत्सद्यांच्या गाठीभेटी, शांतिदूतांची देवाणघेवाण व आंतरराष्ट्रीय राजकारणावरील चर्चा या सर्वांचा उपयोग जागतिक तणातणीचे वातावरण सौम्य करण्यास होतो, ते चांगले राजकारण आहे याचीही जाणीव जपानला आहे. स्वदेशियांना व परकीयांनासुद्धा आपण जागतिक राजकारणात महत्त्वाच्या स्थानांवर आहोत हे पटवून देण्याकरता हे सर्व करणे जरूर आहे.

आग्नेय आशिआयी राजकारणाचे बाबतीतील जपानी दृष्टीकोण प्रौढत्व दाखवीत आहे हे निश्चित. विशेष अपेक्षा न ठेवता प्रयत्न करण्यात काहीही नुकसान नाही हे त्यांचे तत्त्व. १४ एप्रिलला जपानहून लिबरल डेमोक्रॅटिक पक्षाचे उपाध्यक्ष श्री. काशिहामा यांचे नेतृत्त्वाखाली बांडुंग परिषदेच्या दहाव्या वाढदिवसाच्या समारंभात उपस्थित रहाण्याकरता जकार्ताला एक जपानी शिष्टमंडळ गेले असून आग्नेय आशियातील










अनेक राजधान्यांना भेटी देणार आहे. परिस्थितीचे प्रत्यक्ष अवलोकन करून चर्चा करणे हा शिष्टमंडळाचा हेतु आहे.

जपानच्या मते व्हिएटनाममधील परिस्थिती बदलत असून, जपानने मध्यस्थी केल्यास व्हिएटकाँग चर्चेस तयार होईल. त्याचप्रमाणे मलेशिया व इंडोनेशिया या दोघाना एकत्र आणण्यात पण आपल्याला यश येईल असे त्याना वाटत आहे. आग्नेय आशियातील जपानचा खास प्रतिनिधी श्री. शुनिची मात्सुमोटो यानी श्री. काशिहामा यांचे शिष्टमंडळ जकार्ताला भेट देत असताच एक बडा मुत्सद्दी कुलालपूरला पाठवावा अशी सूचना केली आहे. बांडुग उत्सवात भाग घेण्यास आलेले हे चिनी पंतप्रधान चाउ-एन-लाय यांचेबरोबर पण काशिहामा चर्चा करू शकतील असा अंदाज आहे.

आपण फार मोठ्या प्रकरणात हात घालीत आहोत ही गोष्ट दुसऱ्यांचे नजरेत येऊ नये म्हणून जपान फार नम्रतेची भूमिका स्वीकारीत आहे. परंतु त्यानी या सर्वात विशेष लक्ष घालावे अशी रशियाची इच्छा आहे. याची त्याना खात्री आहे. काशिहामा शिष्टमंडळ आशिआयी नेत्याना आंतरराष्ट्रीय शक्तींचा पाठिंबा असलेले एकमेकावर हल्ला न करण्याचे धोरण सुचविणार आहे व या प्रयत्नात त्याना सोव्हिएट रशियाचा संपूर्ण पाठिंबा आहे असे दिसते.

हे शिष्टमंडळ बँकॉकला भेट देणार असून त्यांचा उद्देश टंकुअबदुल रहिमान व अध्यक्ष सुकार्नो यांना एका टेबलाभोवती आणण्यास थायलंडची मदत मिळविणे हा आहे. त्याचप्रमाणे फिलिपाइन्सचे अध्यक्ष मॅक पागल हेही जकार्तामध्ये या शिष्टमंडळास शक्य ती सर्व मदत देणार आहेत. अर्थात् जपानला या सर्व गुंतावळ्यातून मार्ग शोधून काढण्याचा आदेश नाही. परंतु परस्पर विरोधी नेत्यांना एकत्र आणण्याचे महत्कार्य करण्याचा त्यांचा प्रयत्न स्तुत्य म्हटला पाहिजे.

दि इकॉनॉमिस्ट– लंडन. १७ एप्रिल १९६५

---

## लेखकांना विनंति

(१) ‘ नवभारत ’ मासिकासाठी पाठवावयाचे लेख कागदाच्या एकाच बाजूवर शाईने सुवाच्य लिहावे.

(२) लेखाची पोंच ताबडतोब देण्यात येऊन त्यासंबंधी निकाल सामान्यतः एक महिन्यात कळविण्यात येईल. न स्वीकारलेला लेख परत करण्यासाठी अवश्य तो टपालखर्च पाठवावा.

(३) लेखाची मर्यादा सामान्यतः ४००० शब्दांहून अधिक नसावी. अनेक अंकातून लेखांक देण्यापेक्षा विशिष्ट मुद्यावर स्वतंत्र लेख लिहिणे बरे.

(४) आशयाला बाध न आणता लेखाची मर्यादा कमी करण्याचा अधिकार संपादकमंडळाला राहील.

(५) लेखाबद्दल अल्पस्वल्प मोबदला देण्याचे संपादकमंडळाने ठरविले आहे.

(६) अभिप्रायासाठी पाठवावयाच्या पुस्तकांच्या दोन प्रती येणे लवकर अभिप्राय देण्याचे दृष्टीने सोईचे पडते.

(७) लेख, संपादकासाठी इतर काही मजकूर व अभिप्रायासाठी पुस्तके कार्यकारी संपादकांचे पत्त्यावर मुंबईस पाठविणे.



अनुक्रमणिका








## प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड | भाग १ ते ३ | किंमत |
| साधी बांधणी ... | ... ... | ८०·०० |
| कापडी बांधणी ... | ... ... | १०४·०० |
| (२) धर्मकोश - उपनिषत्काण्ड | भाग १ ते ४ | |
| साधी बांधणी ... | ... ... | १५०·०० |
| कापडी बांधणी ... | ... ... | १८२·०० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड | भाग १ ला .... | ४५·०० |
| कापडी बांधणी ... | .... ... | ५३·०० |
| (४) मीमांसादर्शन ... ... | ... ... | ३०·०० |
| (५) मीमांसाकोश ... | भाग १ ते ६ | २३०·०० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश | ... ... | ६·०० |
| (७) बौद्धागमार्थसंग्रहः .... | ... ... | २०·०० |
| (८) हिंदुधर्माची समीक्षा ( लक्ष्मणशास्त्री जोशी ) | ... | ५·०० |
| (९) वैदिक संस्कृतीचा विकास ... | .. ... | ६·०० |
| (१०) नवमानवतावाद ... | ... ... | २·५० |
| (११) मानवाचा आदर्श ... ... | ... ... | ३·०० |
| (१२) चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान | | |
| ( प्रा. सदाशिव आठवले ) | ... | ३·०० |
| (१३) गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) | ... | २·५० |
| (१४) महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना | | |
| ( श्री. चा. अ. दाभोलकर ) | .... | २·०० |

अनुक्रमणिका